# नवभारत

आॅक्टोबर २०१२

## शेषराव मोरे यांची संशोधकीय वाटचाल

भारतीय संतपरंपरेच्या संदर्भात
विदर्भातील संतांचे प्रबोधन

## गीतारहस्याची पूर्वपीठिका

"वाई : कला आणि संस्कृती"
काही राहून गेलेल्या बाबी !

## लौकिक-अलौकिकाचे मानसतरंग

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.



– संपादक मंडळ










प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६६ । अंक १ । ऑक्टोबर । २०१२
निज भाद्रपद/आश्विन शके १९३४
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका







# नवभारत

## ऑक्टोबर २०१२

## अनुक्रमणिका


❖ शेषराव मोरे यांची संशोधकीय वाटचाल — ३
प्रा. संतोष शेलार

❖ भारतीय संतपरंपरेच्या संदर्भात विदर्भातील संतांचे प्रबोधन — ७
डॉ. सुभाष सावरकर

❖ गीतारहस्याची पूर्वपीठिका — २५
प्रा. श्री. मा. भावे

पुस्तक परीक्षण

❖ "वाई : कला आणि संस्कृती" : काही राहून गेलेल्या बाबी ! — ३५
प्रा. विजयकुमार फरांदे

❖ लौकिक-अलौकिकाचे मानसतरंग — ३८
प्रा. डॉ. पंडितराव पवार

# शेषराव मोरे यांची संशोधकीय वाटचाल

प्रा. संतोष शेलार

१९८० नंतरच्या काळात जे संशोधक पुढे आले, त्यांत प्रा. शेषराव मोरे यांचे नाव अग्रक्रमाने घ्यावे लागेल. एखादा वेगळा विषय निवडावा, त्याची मिळतील तितकी जास्तीत जास्त साधनं परिश्रमपूर्वक गोळा करावीत, त्यातून जे निष्कर्ष हाती लागतील ते आपल्या लोकप्रियतेचा विचार न करता प्रामाणिकपणे मांडावेत, अशी त्यांची पद्धती राहिलेली आहे. ऐतिहासिक वास्तव प्रामाणिकपणे मांडल्याने आपल्या लोकप्रियतेचा बळी जाणार, हे त्यांनी गृहीतच धरलेले आहे. त्यातून त्यांनी अनेक गटांना दुखावूनही ठेवलेले आहे. त्यांच्या एका वृत्तपत्रीय स्तंभाचे नावच मुळी 'अप्रिय पण......' असे होते. असे असूनही त्यांच्या लिखाणावर प्रेम करणारा एक खास असा वाचकवर्ग निर्माण झाला आहे. त्यांच्या वैचारिक विरोधकांनी व स्वतंत्र चिकित्सक अभ्यासकांनी त्यांची प्रारंभी दखल घेतली; नंतर मात्र त्यांच्या अभ्यासपूर्ण लिखाणाची फारशी दखल घेतली गेली नाही.

मोरे यांनी संशोधनक्षेत्रात पदार्पण केले तेच मुळी 'सावरकर' हा विषय घेऊन. त्यांचे पहिले दोन ग्रंथ सावरकरांवर आहेत. परिणामी त्यांच्यावर 'सावरकरवादी' हा शिक्का पडला. याआधीसुद्धा या विषयावर विस्तृत लिखाण झाले आहे. मात्र केवळ 'सावरकरांचा बुद्धिवाद' एवढाच विषय घेऊन तपशीलवार व साधार लेखन मोरे यांनीच केले आहे. सावरकर त्यांच्या हयातीत बुद्धिवादी म्हणून प्रसिद्ध होते. सावरकरांच्या समकालीन जी पुरोगामी नि समाजवादी मंडळी होती, त्यांना सावरकरांचा हिंदुत्ववाद पसंत नसला, तरी त्यांच्या समाजकारणावर आणि एकूणच बुद्धिवादी विचारपद्धतीवर ही मंडळी खूश होती. सावरकरांसारख्या बुद्धिवाद्याने स्वतःस हिंदुत्ववादी म्हणवावे, याचे त्यांना वाईट वाटे. स्वातंत्र्योत्तर कालखंडात मात्र ही परिस्थिती हळूहळू पालटू लागली. समाजवादी उर्फ पुरोगामी आणि हिंदुत्ववादी असे साचेबद्ध धृवीकरण वैचारिक क्षेत्रात होऊ लागले. वैचारिक असहिष्णुताही वाढत गेली. अशा परिस्थितीत सावरकरांसारख्या पुरोगामी पण हिंदुत्ववादी (म्हणजे हिंदुधर्मवादी नव्हे, तर हिंदुसंघटनवादी ) प्रतीकाचा बळी जाणे अपरिहार्य होते. य. दि. फडके यांच्यासारख्या थोर संशोधकाने सावरकरांचे समाजकारण आणि बुद्धिवाद कमी प्रतीचा होता, असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. त्यानंतर फडक्यांचा वारसा पुरोगाम्यांनी या टोकापर्यंत पुढे नेला, की सावरकरांच्या जीवनातील प्रत्येक चांगली गोष्ट संशयास्पद ठरविण्यात आली. याच काळात पुरोगामी व हिंदुत्ववादी या दोन्ही गोटांच्या परिघावर एक छोटा अस्वस्थ गट होता. हिंदुत्ववाद्यांचा कडवेपणा व प्रतिगामी प्रवृत्ती त्याला नको होती; तर पुरोगाम्यांची मुस्लिम प्रश्न आणि एकूणच सेमेटिक धर्मांची आक्रमकता याविषयी असलेली बोटचेपी भूमिकाही त्याला बरोबर वाटत नव्हती. मोरे यांनी सावरकरांना केंद्रस्थानी ठेवून ही कोंडी फोडण्याचा प्रयत्न केला. य. दि. फडक्यांसारख्या पुरोगाम्यांनी व सावरकर-अनुयायी म्हणविणाऱ्या हिंदुत्ववाद्यांनी सावरकर-विचारांचा कसा विपर्यास केला आहे, याचे मोरे यांनी विस्तृत व साधार विवेचन केले. या ग्रंथाची बरीच चर्चा झाली. 'मोरे' हे नकली आडनाव असावे, असाही संशय व्यक्त करण्यात आला. या ग्रंथात ज्येष्ठ अभ्यासकांवर टीका केली असल्यामुळे ते अस्वस्थ झाले. या ग्रंथात मोरे यांनी आधारासाठी खूप वेळा डॉ.आंबेडकरांचे नाव घेतले असल्यामुळे ते आंबेडकरांचे अपहरण करीत आहेत, असेही आरोप झाले. डॉ.रावसाहेब कसबे यांनी विस्तृत ग्रंथ लिहून प्रतिवाद करण्याचा प्रयत्न केला. त्यांचेही खंडन मोरे यांनी 'विचारकलह' या पुस्तकाद्वारे केले. सावरकरांवरील दोन ग्रंथांमुळे काही पुरोगाम्यांनी त्यांना काळ्या यादीत टाकले. सावरकरांचे समर्थन केल्यामुळे हिंदुत्ववाद्यांना बरे वाटले असले, तरी मोरे यांनी मांडलेला 'सावरकर' त्यांना पटला नाही. 'सावरकरांचा बुद्धिवाद' या ग्रंथाचा परिचय वा परीक्षण

हिंदुत्ववादी म्हणवणाऱ्या नियतकालिकांमध्ये आले नाही. हे पुस्तक १९८८ साली प्रकाशित झाले. तेव्हापासून आजपर्यंत क्वचितच त्यांना हिंदुत्ववादी गटाकडून सावरकरांवर बोलण्यासाठी आमंत्रण दिले गेले. त्यांपैकी बहुतांश वेळा त्यांच्या व्याख्यानामुळे बोलवणाऱ्यांना पश्चात्ताप झाला. सावरकरांवरील या दोन ग्रंथांमुळे वर उल्लेखलेल्या परिघावरील अस्वस्थ गटाला मात्र बरे वाटले.

यानंतर मोरे काश्मीर प्रश्नाकडे वळले. मोरे यांचे विचार पाहता त्यांचे काश्मीर प्रश्नाकडे वळणे स्वाभाविक होते. काश्मीर येथील मुस्लिम प्रश्न, तेथील मुस्लिमांचा भारत सरकारला असलेला विरोध, काश्मीरचे पाकिस्तानबरोबर असलेले भौगोलिक संलग्नत्व, शेख अब्दुल्लांची स्वतंत्र काश्मीरची भूमिका - त्यासाठी प्रसंगी पाकिस्तानविरोध आणि भारतीय जनतेची काश्मीरविषयीची भावनिक गुंतवणूक यांतून हा गुंतागुंतीचा प्रश्न निर्माण झाला आहे, अशी मोरे यांनी मांडणी केली. या मांडणीमुळे परत एकदा पुरोगामी आणि हिंदुत्ववादी हे दोन्ही गट नाराज झाले. विशेष म्हणजे या ग्रंथाचा भर तटस्थपणे प्रश्नाची मांडणी करण्यावर आहे; त्याची उत्तरे शोधण्यावर नाही. सावरकरांवरील त्यांचे ग्रंथ अतिशय तर्ककठोर असले, तरीही त्यात अभिनिवेश बराच आहे; तो या ग्रंथापासून दिसणे बंद झाले.

अर्थात मोरे यांना जनसामान्यांत खरी लोकप्रियता मिळाली ती त्यांच्या 'अप्रिय पण.......' या वृत्तपत्रीय स्तंभलेखनामुळे. त्यांच्या धक्कादायक लेखांमुळे वाचकांमध्ये खळबळ उडाली. पुढे अभ्यासाला वेळ कमी मिळतो, म्हणून त्यांनी ते स्तंभलेखन बंद केले. त्या लेखांचे पुस्तक दोन भागांत प्रकाशित झाले आहे. या लेखांतून मुस्लिम प्रश्न, हिंदुत्ववाद, सेक्यूलॅरिझम, हिंदू समाजाची मानसिकता, जातींचा प्रश्न इ. गोष्टींवर त्यांनी प्रकाश टाकलेला आढळतो. तटस्थपणे एखाद्या प्रश्नाची मांडणी करणे हा प्रकार येथेही आढळतो. उदा., पांडुरंगशास्त्री आठवले आणि मा. म. देशमुख यांचे विचार त्यांच्याच शब्दांत मांडून त्यांतील समाज-घातकीपणा त्यांनी उघड केला आहे.

यानंतर मोरे यांनी आंबेडकरांच्या सामाजिक धोरणावर प्रकाश टाकणारा चिकित्सक ग्रंथ लिहिला. बाबासाहेबांचे ध्येय स्थिर असले, तरी त्यांच्या धोरणात काळानुसार बदल झाले आहेत. हा बदल केवळ विचार व कृतीपुरता मर्यादित नाही; तर त्याचा परिणाम थेट त्यांच्या इतिहासमीमांसेवरही झाला. आपलेच कितीतरी ऐतिहासिक सिद्धान्त त्यांनी कितीतरी वेळा खोडून काढले आहेत. हा बदल का व कसा झाला, याची कारणमीमांसा मोरे यांनी केली आहे. बाबासाहेबांचे लिखाण विस्तृत असल्याने व ते समोरासमोर ठेवून फारसे कोणी वाचले नसल्याने, त्यांच्यात झालेले बदल वाचकाला नीट कळतच नाहीत. त्यामुळे बऱ्याचदा परस्परविरोधी विचारधारा असलेले अभ्यासक आपल्या वेगवेगळ्या (किंवा परस्परविरोधीही) इतिहासमीमांसेसाठी बाबासाहेबांचा आधार घेत असतात. मोरे यांनी हे दाखवून दिले, की बाबासाहेबांचा आधार घेताना आपण कुठल्या काळातील बाबासाहेबांचा आधार घेतो, याचे भान असणे आवश्यक आहे. या ग्रंथाचीही अभ्यासकांनी दखल घेतल्याचे आढळत नाही.

यानंतर मोरे यांचा 'मुस्लिम मनाचा शोध' हा ग्रंथ प्रकाशित झाला. इस्लामची शिकवणूक काय आहे व तिचा मुस्लिम समाजमानसावर काय परिणाम झाला, हा या ग्रंथाचा विषय आहे. बरेच अभ्यासक इस्लाम हा कसा धर्मसहिष्णू आहे हे सांगताना ठरावीक सहा-सात आयती उद्धृत करीत असतात. या आयती मक्काकालीन आहेत. त्या वेळी प्रेषितांची शक्तीही कमी होती. मदिनाकाळात मात्र या सर्वधर्मसमभावी भासणाऱ्या आयती येणे बंद होऊन उघड उघड आक्रमक आयती कशा अवतरू लागल्या, हे मोरे यांनी साधारणपणे दाखविले आहे. ज्याला मुस्लिम प्रश्नाचा अभ्यास करावयाचा असेल, त्याला हा ग्रंथ टाळून जाताच येणार नाही; किंबहुना हा ग्रंथ वाचल्यावर आता मुस्लिम प्रश्नाविषयी काहीही जाणणे शिल्लक उरले नाही, अशीच वाचकाची भावना होते. इस्लाम या विषयावर मराठीत अभ्यासपूर्ण आणि चिकित्सक असा हा पहिलाच ग्रंथ आहे.

वरील ग्रंथात प्रेषित महंमदांच्या मृत्यूपर्यंतचा इतिहास दिला गेला होता. त्यांच्यानंतर सत्तेवर आलेले पहिले चार खलिफा इस्लामच्या इतिहासात आदर्श मानले जातात.








त्यांच्यावरही मोरे यांनी ग्रंथ लिहिला आहे. या खलिफांनी केलेले धर्मप्रसाराचे आणि राज्यप्रसाराचे कार्य यांचा खोलवर परामर्ष या ग्रंथात ते घेतात. त्या काळातील लढाया, कत्तली, आपापसातील भांडणे हे सर्व वाचल्यावर वाचकाला आधुनिक काळातील इस्लामचा काफिरांशी व आपसात चाललेला संघर्ष आठवल्याशिवाय राहत नाही. तसेच मुस्लिम राजसत्ता आणि धर्मसत्ता एवढ्या वेगाने जगात का पसरली, तेही समजते.

२००७ साली १८५७ च्या उठावाला १५० वर्षे पूर्ण झाली. त्या मुहूर्तावर मोरे यांनी '१८५७ चा जिहाद' या नावाचा ग्रंथ प्रसिद्ध केला. मराठीत या विषयावर याआधीही अभ्यासपूर्ण ग्रंथ लिहिले गेले आहेत. मात्र मोरे यांनी नव्या दृष्टिकोनातून या घटनेचा अर्थ लावला. इस्लामच्या अभ्यासामुळे दृष्टीत पडलेला फरक त्यांच्या उपयोगी पडला. उठावकाळात प्रकाशित झालेले जाहीरनामे याआधीही खूप अभ्यासकांनी वाचले होते. मात्र त्यांतील इस्लामिक परिभाषा क्वचितच कोणाला समजे. मोरे यांनी त्यातला धार्मिक गर्भितार्थ तर समजावून सांगितलाच; पण ते जाहीरनामे मराठीत प्रकाशित करून अभ्यासकांना/वाचकांना स्वतंत्र अर्थ काढण्यास वावही ठेवला. या उठावात ज्या मुस्लिमांनी भाग घेतला, त्यांच्यावर 'वहाबी' विचारांचा प्रभाव होता. मोरे यांनी ही गोष्ट स्पष्ट करण्यासाठी उत्तर भारताचा उठावापूर्वीचा १०० वर्षांचा इतिहास सांगितला आहे. मराठीत या 'वहाबी' प्रभावाविषयी एवढे सखोल पहिल्यांदाच लिहिले गेले आहे. हा ग्रंथ प्रकाशित होण्याअगोदरच लोकांच्या प्रतिक्रिया येऊ लागल्या. सावरकरांच्या १८५७ विषयक निष्कर्षांचे खंडन केल्यामुळे सावरकरवादी खोलवर दुखावले गेले; तर उठाव मुस्लिम राज्य आणण्यासाठी होता, हे सांगितल्यामुळे पुरोगामी दुखावले. कोणाही अभ्यासकाने त्यांची ठामपणे बाजू घेतली नाही, की कोणी त्यांचे साधार खंडनही केले नाही. झाली ती शेरेबाजी. उदा., प्रकाश बाळ यांचा असा आरोप आहे, की सत्य सांगून मोरे हे मुस्लिम प्रतिमेचे राक्षसीकरण करीत आहेत.

## इतिहासलेखनपद्धती

इतिहासलेखनाच्या बाबतीत मोरे हे प्रत्यक्षार्थवादी (Positivist) पद्धतीच्या जवळ जातात. रँके यांचा वस्तुनिष्ठतावाद त्यांना भावत असावा. पुराव्यांची सुसंगत मांडणी व तर्कशुद्ध युक्तिवाद यांच्या साहाय्याने सत्याच्या अधिकाधिक जवळ जाता येते, असा त्यांचा विश्वास आहे. कोणतेही विधान पुराव्याशिवाय करावयाचे नाही, अशी त्यांची शिस्त आहे. त्यांनी य. दि. फडके यांच्यावर कितीही टीका केली असली, तरी इतिहासलेखनशास्त्रात त्यांनी वारसा चालवला तो य. दिंचाच !

शेषराव मोरे हे दर्जेदार भाष्यकार असले, तरी त्यांचा मूळ पिंड हा संशोधकाचाच आहे. त्यांच्या इतिहास-संशोधनाची पद्धती नेहमी तळ गाठणारी राहिली. त्यांच्या संशोधनाचा आवाका लक्षात घेता त्यात आंतर-विद्याशाखीयता कमी राहिली, असे जाणवते. (हे विधान करताना डोळ्यासमोर कुरुंदकर आहेत.) कोणत्याही परिकल्पक (Speculative) तत्त्वज्ञानावर त्यांचा विश्वास नाही. काही महत्त्वाच्या विश्लेषणपद्धतीकडेही त्यांनी दुर्लक्ष केल्याचे जाणवते. उदा., आर्थिक संरचनेतील बदल हा सर्व इतिहासाच्या मुळाशी आहे, असे मार्क्सवादी मानतात. ही गोष्ट अतिशयोक्त असली, तरी समाजात बदल घडवणाऱ्या शक्तींपैकी आर्थिक संरचना हीसुद्धा एक शक्ती आहे, हे स्वीकारण्यास प्रत्यवाय नसावा. मोरेंच्या लेखनात या शक्तीचे अस्तित्व फारसे जाणवत नाही. याला काहीसा अपवाद 'चार आदर्श खलिफा' चा आहे.

अन्वयार्थाच्या पातळीवर इतिहाससंशोधक कुठल्या ना कुठल्या कुळाची (School) परंपरा चालवीत असतो. सावरकर-कुरुंदकर-आंबेडकर (साकुआ) यांच्या विचारांचा प्रभाव त्यांच्यावर आहे. त्यांचा बुद्धिवाद हा दि. य. देशपांडे यांच्या जातकुळीचा आहे. त्यांचे बहुतांश निष्कर्ष कुरुंदकरांच्या निष्कर्षांशी नाते सांगतात. 'अन्वय' मधील कुरुंदकरांचा सावरकरांवरील लेख व मोरे यांचे सखोल संशोधनांती निघालेले सावरकरांविषयीचे निष्कर्ष यांत खूप साम्य आहे. तसेच मोरे यांनी आंबेडकरांवर संशोधन करून जे निष्कर्ष काढले, त्यांचीही बीजरूपाने मांडणी कुरुंदकरांनी केली होती. इस्लामविषयीचे त्यांचे सारे संशोधन कुरुंदकरांचाच वारसा सांगणारे आहेत. मोरे यांनी 'सावरकरांचा बुद्धिवाद' या पहिल्या ग्रंथात गांधीजींच्या मुस्लिम अनुनयाच्या धोरणावर टीका केली

आहे. तसेच गांधीजींची बाजू घेऊन लिहिणाऱ्या कुरुंदकरांवरही टीका केली आहे. मात्र पुढे 'विचारकलह' या पुस्तकात गांधीजींच्या धोरणाची अपरिहार्यता व मुत्सद्दीपणा मान्य करून परत कुरुंदकरांचा रोल पकडला आहे. यावरून अभ्यासांती निष्कर्ष बदलण्याची त्यांची वृत्ती दिसून येते. अगदी अलीकडे १८५७ बाबत त्यांनी जे निष्कर्ष काढले, त्यांच्या जवळ जाणारे लेखन कुरुंदकरांनी केले आहे. काश्मीरप्रश्नाबाबतीत मात्र मोरे आणि कुरुंदकर यांच्या भूमिका फारच वेगळ्या/परस्परविरोधी आहेत.

आतापर्यंत शेषराव मोरे यांनी जी वाटचाल केली आहे, ती एकट्यानेच केली आहे. स. ह. देशपांडे यांच्यासारख्या काही अपवादात्मक अभ्यासकांनी त्यांना पाठिंबा दिला. असे असूनही आपल्या खोलवर संशोधनाने व निराळ्या विचारपद्धतीने त्यांनी आपला ठसा उमटविला आहे, हे निश्चित. येत्या ऑगस्ट महिन्यात त्यांचा 'काँग्रेसने आणि गांधीजींनी अखंड भारत का नाकारला?' या नावाचा ग्रंथ प्रकाशित होतो आहे. हा ग्रंथ म्हणजे फाळणीच्या मूळ कारणांचा शोध घेणारा ९० वर्षांचा इतिहास आहे. अखंड भारतात हिंदू व मुस्लिम यांच्यात सत्तेचे वाटप कशा प्रकारे होणार होते? केंद्र व प्रांत यांच्यातील संबंध कसे राहणार होते? त्यात संस्थानांचे स्थान काय राहणार होते? राष्ट्रवादी मुस्लिमांना हव्या असणाऱ्या अखंड भारताचे स्वरूप काय होते? आणि मुख्य म्हणजे राज्यघटनेचे स्वरूप काय/कसे राहणार होते? या प्रश्नांची सखोल चर्चा या ग्रंथात आहे.





अनुक्रमणिका

# भारतीय संतपरंपरेच्या संदर्भात विदर्भातील संतांचे प्रबोधन

डॉ. सुभाष सावरकर

## (१) भारतीय प्रबोधनाचे आधारस्तंभ

प्रबोधन ही संज्ञा युरोपीय देशांमध्ये विज्ञानयुगाशी निगडित आधुनिकीकरणाची सहोदर असून युरोपात चौदाव्या ते सोळाव्या शतकांदरम्यानच्या कालखण्डाला प्रबोधनयुग (Renaissance) म्हणून ओळखले जाते. भारतात मात्र ब्रिटिशांचे आगमन ते भारताची स्वातंत्र्यप्राप्ती यादरम्यानचा कालखंड प्रबोधनाचा कालखंड म्हणून ओळखला जातो. प्रबोधन ही संज्ञा मराठीत Renaissance आणि Enlightenment अशा पर्यायी अर्थांनी वापरली जाते. राजा राममोहन रॉय ते डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांदरम्यानच्या आंग्लविद्याविभूषित भारतीय सुधारणावादी विचारवंतांनी आधुनिक युगनिर्माणाच्या हेतूने Renaissance या अर्थाने उदित झालेला प्रबोधनाचा वैचारिक वारसा एकंदर भारतीय समाजाला दिल्याचे सर्वविदित आहे. मात्र Enlightenment या अर्थाने भारतीय उपखंडाचा इतिहास शोधू जाता प्राचीन काळातील बुद्धविचारापासून पुढे मध्ययुगातील गोरक्षनाथ, नाथसंप्रदाय, शैव-वैष्णव तथा बहुआचार्य प्रभावित भक्तिसंप्रदाय, तर महाराष्ट्रातील महानुभाव-अवधूत-वारकरी आदी संतांचा भक्तिसंप्रदाय आदी चळवळींच्या कार्याचा विचार करणे भाग पडते; कारण या चळवळींनी त्या त्या कालखण्डातील प्रस्थापित मानव्यविरोधी विचारांच्या विरोधात प्रबोधनाची प्रकाशदालने जनसामान्यांसाठी उघडून दिली असल्याचे दिसून येते; इतकेच नव्हे तर धर्मविचारातील क्रांतिकारी संकल्पनांचा भारतभर प्रसार करण्यासाठी इष्ट प्रचारयंत्रणा व संस्था/संस्थाने ही त्या त्या काळात या चळवळींनी उभारून ठेवल्याचे आढळते.

प्रबोधनाची प्रक्रिया ही इतिहासात सावकाश परिवर्तन घडवून आणणारी प्रक्रिया असून, परंपरेचे अवरुद्ध झालेले व मानव्यविरोधी दिशेने वळविण्यात आलेले प्रवाह इष्ट दिशेने गतिमान करणे, हे तिचे प्रयोजन असते. त्या त्या काळात उपलब्ध असलेल्या साधनसामग्रीतून प्रबोधनाची प्रक्रिया कार्यान्वित करण्यासाठी प्रभावी माध्यमे उभारली जातात आणि संघटना/संस्थांद्वारे प्रबोधनाचा प्रकाश जनसामान्यांपर्यंत पोचविला जातो. भारतीय परिप्रेक्ष्यात प्रबोधनप्रक्रिया ही वेदोत्तर काळापासूनच्या इतिहासपटावर अधूनमधून प्रभाव गाजवीत असलेली दिसते. उपनिषद्-काळात तत्त्वचिंतनाची अनेक पीठे उदयास आली व त्यातून भारतीय दर्शने बद्धमूल होत गेली. परस्परसंघातून व विचारमंथनातून भारतीय दर्शनांमध्ये तात्त्विक दृष्टीने परिवर्तने घडून येत गेली. परन्तु वेदान्त व षड्दर्शनांमधील ज्ञानव्यवहार हा निवडक अभिजनांमध्येच राहिला. त्यामुळे त्यातून पुरोहितशाही बोकाळत गेली व कष्टकरी बहुजनसमाज ज्ञानवंचित अवस्थेत विकलांग होऊन जगत राहिला. त्या त्या काळी जनाभिमुख असलेली जैन, बौद्ध, लोकायत ही दर्शने तेवढी प्रबोधन-प्रचाराची आपापली साधने वापरत जनसामान्यांमध्ये ज्ञानाचा प्रकाश पोचवीत राहिली. त्यातही जीवनधारक ज्ञानाचा प्रचार करण्यासाठी प्रभावी व्यवस्थापन उभारू शकले, ते केवळ तथागत गौतम बुद्ध (इ.स.पू.५४०). भारताच्या बाहेरही चहूदिशांनी त्यांनी धम्मप्रचारार्थ क्रांतिकारी प्रज्ञेच्या भिख्खूंना पाठविले आणि आपल्या क्रांतिकारी धम्माचे (जीवनविषयक तप:पूत चिंतन तथा आचारमार्गाचे) प्रभावी प्रबोधन साधले.

बुद्धाचा धम्म म्हणजे तत्कालीन पुरोहितशाही-कर्मकाण्ड, यज्ञातील प्राणिहिंसा, गुलामगिरी व शोषण यांविरुद्धची क्रांती होती. मानवी जीवनातील दु:खभोगां-बरोबरच जीवनश्रेयप्राप्तीसाठी करण्यात येणाऱ्या कायाक्लेष व अतिरेकी तत्त्वानुसंधानक साधनमार्गांचेही निरसन करणाऱ्या ह्या धम्माची शिकवण सुमारे अर्धशतकपर्यंत प्रबोधनरूपाने स्थिरपाद झाली व सामान्यांबरोबरच अधिकारी, राजपुरुष व अभिजन यांनीही तथागताचे अनुयायित्व स्वीकारल्यामुळे बौद्ध तत्त्वचिंतनाचा फार मोठ्या प्रमाणावर प्रसार झाला. दु:खादी चार आर्यसत्ये आणि सम्यक् दृष्टी आदी अष्टांगिक मार्ग हा त्यांच्या

अनुक्रमणिका

प्रबोधनाचा गाभा होता. जगाचे स्वरूप हे 'सब्बं क्षणिकम् सब्बं दु:खं' असे असून जीव मात्र अमृतपुत्र असल्यामुळे 'निब्बानं परमं सुखं' – अर्थात निर्वाणाद्वारे तो परमसुखाचा धनी होऊ शकतो, हा मृत्युंजयबोध बुद्धाने केला. ईश्वर, आत्मा, परलोक आदी विषयांवर वादाची रणे न माजविता 'दुष्कृत निवारा आणि सुकृत आचरा'– असा सुटसुटीत बोध त्यांनी केला. पंचशीलाद्वारे अहिंसा, अचौर्य, संयमित कामभोग, सत्यवचन व (मादक द्रव्याचे) असेवन– अशा ५ आचारतत्त्वांचे त्यांनी बोधन केले. मनुष्य नीच व उच्च होतो तो जन्माने नव्हे; तर कर्माने होतो. तप, ब्रह्माचरण, संयम, दम यांनीच खरे ब्राह्मणत्व लाभते. जीवनाचे अंतिम ध्येय 'निर्वाण' म्हणजेच विकार–विनाशातून (आसक्ती, द्वेष, मोह यांच्या क्षयाअन्वये) प्राप्त होणारी स्वानुभवजन्य परमशांती–अशा जीवनश्रेयाची नि:शंक ग्वाही जनमानसाला दिली.

सुमारे ५०० वर्षे चाललेल्या या धम्मप्रबोधनात– विशेषत: हीनयानी आचार व उपासनापद्धतीत आलेली संकुचितता काढून धम्माला व्यापक/सर्वसमावेशक स्वरूप देण्याचे कार्य पुढे नागार्जुन, वसुबंधू आदींनी दुसऱ्या शतकापासून केले. विविध परकीय आक्रमणांची पार्श्वभूमी असताना ते ६व्या/७व्या शतकापर्यंत टिकलेही ! पण पुढे त्यांत शैव-शाक्त उपासनापद्धतींच्या साधकांमध्ये दुफळी माजून मध्ययुगापर्यंत त्यांच्या साधनापद्धती अविवेकी अतिरेकापायी अध:पतित झाल्या. त्यांचे शुद्धीकरण करणारे व इष्ट बोध देणारे प्रबोधक वाङ्मय नाथसिद्ध गुरू गोरक्षनाथांनी निष्कलंक चारित्र्य आणि अपूर्व संघटनशक्तीच्या बळावर ९व्या शतकात आरंभले. त्यांच्या प्रबोधनाचे माध्यम प्रादेशिक प्राकृत भाषांमधून काव्य/वाङ्मयनिर्मिती, हे होते. गोरक्षनाथांनी पतंजलिप्रणीत योगमार्गाला व्यवस्थित रूप दिले. त्यांच्या भारतव्यापी संचारामुळे जागोजागी नाथपीठे उभी राहिली. नाथ-संप्रदायात ब्राह्मणांपासून चांडाळांपर्यंत आणि पुरुषांपासून स्त्रियांपर्यंत कोणालाही मज्जाव नव्हता. प्राकृत भाषांचा अवलंब, कर्मकाडांचा निषेध, योगविद्या व कृष्णभक्तीचा पुरस्कार, हरि-हर ऐक्य, अद्वैतवाद, दलितांचा कळवळा हे उपक्रम–सोबतच प्रबोधनाचे कार्यक्रम महाराष्ट्रात सर्वप्रथम नाथपंथाने सुरू केले. खोलात जाऊन पाहिल्यास दत्त, अवधूत, नाथ, महानुभाव, भागवत, वारकरी हे सर्व मागचे-पुढचे भक्तिसंप्रदाय परस्परांचे आत्मीय बंधुबांधवच होत (प्रा. गं. बा. सरदार, श्री. रा. चिं. ढेरे). या सर्वांना समानतेचे सूत्र पुरविणारा नाथसंप्रदाय हा प्रामुख्याने समन्वयशील असून समता हेच त्याचे अधिष्ठान आहे. श्री गोरक्षनाथ हे त्याचे प्रतिभाशाली अध्वर्यू 'सत्कार्यवादा'चे पुरस्कर्ते असून उपनिषत्कथित योगमार्गाचा पुरस्कार तथा प्रभावशाली रचना व प्रचारकार्य यांमधून ते संस्मरणीय युगप्रबोधक ठरले आहेत.

पुढे १२ व्या शतकात कर्नाटकातील महान क्रांतिकारी युगपुरुष महात्मा बसवेश्वर (सन ११३२) यांनी कन्नड/तेलगू भाषेतील साहित्यनिर्मिती व धर्मतत्त्वप्रतिपादन यांच्या माध्यमातून जनजीवनात प्रभावी क्रांती घडवून आणली. बिदर जिल्ह्यातील कल्याणनगरीत बिंज्जलनरेशाने त्यांना प्रधानमंत्री बनविले. त्या पदाचा सदुपयोग करीत महात्मा बसवेश्वरांनी राजधानीला शैवसंतांच्या सत्संगाचे ज्ञानपीठच बनवून सोडले. त्यांनी आरंभलेल्या व शेकडो शिवभक्तांनी निर्मिलेल्या वचनवाङ्मयाने समाजात चैतन्याची लाट उत्पन्न केली; 'अनुभव मंडप' हे प्रभावी धर्मपीठ उभारले. तिथून प्रेरणा घेऊन सर्व स्तरांतील लोक सामाजिक, आर्थिक, सांस्कृतिक, राजकीय अशा सर्वच क्षेत्रांमध्ये प्रबोधनाचा सुकाळ अनुभवू लागले व त्यांच्या जाणिवा जागृत होऊ लागल्या. 'भक्तीसाठी आत्महिंसा नको तसेच परहिंसाही नको'– अशा ठाम जीवबोधाबरोबरच प्रबोधक साहित्य व शुद्ध भक्ती यांच्या आधारे त्यांनी मानवी जीवनमूल्यांची समाजजीवनात समृद्धी केली. 'सर्वं शिवमयं जगत्' या घोषणेसह 'जातिश्रेष्ठत्व हा वेडाचार' जाहीर करून शुद्ध भक्ती हीच एकमेव श्रेष्ठतेची कसोटी त्यांनी जनतेला दिली. महात्मा बसवेश्वर हा १२ व्या शतकातील भारतात भक्तियुक्त समाजवादाचा पाया घालणारा पहिला युगपुरुष म्हटला पाहिजे. जातिभेद, वर्गभेद झुगारून देऊन समता--श्रम–भक्ती यांच्या पुरस्काराद्वारे 'सर्वस्व अर्पून शुद्ध झालो'– म्हणण्याच्या अंतिम अवस्थेप्रत स्वत: पोचून शिवभक्तांच्या मांदियाळीलाही त्यांनी शुद्ध–सुस्नात करून सोडले. त्यांचे प्रबोधक वाङ्मय हा सामूहिक जाणिवांच्या उठावाचा एक आदर्शच म्हटला पाहिजे.

सावता–नामदेव–ज्ञानदेवादी महाराष्ट्रीय संतांपूर्वीचे








महासंत श्रीचक्रधर हेसुद्धा भारतीय प्रबोधनाचे श्रेष्ठ आधारस्तंभ असून पंजाब, काश्मीर, वायव्यसरहद्द प्रांतापर्यंत त्यांची एकेश्वरी द्वैती विचारांची शिकवण पोचली आहे. "दु:खरूपता, पापमूलता, अनित्यता इथे तिन्ही नव्हति तरि संसारावाचौनि आणिक काई गोमटे असे?"– म्हणणारे श्रीचक्रधर साधकांसाठी संन्यास/निवृत्तिमार्ग उपदेशीत; परंतु प्रापंचिक स्त्रीपुरुषांना ते मोहाविना संसार करण्याचा उपदेश करीत; "कराल तरही होईल की गा : उपावो न पवे ऐसे काई असे?" असा रोखठोक प्रयत्नवाद शिकवीत. व्यायामादींची व जनसेवेची कामेही ते करवून घेत. वैदिक कर्मकांडाचे मार्तंड हेमाद्रीपंडित, ब्रह्मसानू, महदाश्रम आदी हे पुरोहितशाहीचे समर्थक; तर श्रीचक्रधर म्हणजे हे "तुम्ही जत्रेक्षेत्रा न वाचावे : व्रतोपवास न करावे" – असा क्रांतिकारी उद्‌घोष करणारे भक्तिमार्तंड होत. सकल विद्या व कलांचे जणू माहेरच– अशा सर्वज्ञ श्रीचक्रधर स्वामींच्या असामान्य प्रभाव-प्रबोधनाच्या प्रकाशाने मराठी सारस्वतात प्रबोधनाची पहाट झाली. 'लीळाचरित्रा'तील सिद्धान्तसूत्रपाठ किंवा दृष्टान्तपाठ (इ.स.१२७४) यांमधून आलेली सैद्धान्तिक भूमिका आणि त्यांच्या चिकित्सेतून निर्माण झालेले व्याकरण-कोशादी ग्रंथच नव्हे; तर काव्य, खंडकाव्य व कथादी ललित साहित्यही प्रबोधनाच्या ऊबेने मोहरून आले.

### (२) मध्ययुगीन संतांचे प्रबोधन

#### संतकवी नामदेव–

मध्ययुगात भागवत धर्ममंदिराचा पाया रचला तो आद्यसंत सावता यांनी (पाहा : आद्यसंत श्रीसावता, १९७६–सुदाम सावरकर). त्यानंतर संत नामदेव उदयास आले व तत्कालीन समाजाच्या दुखण्यांवर भागवतधर्म हाच उपाय असल्याचे ध्यानात घेऊन त्यांनी वारकरी संप्रदायाचे प्रवर्तन केले. समाजाची मानसिकता बदलण्यासाठी त्यांनी कीर्तनसंस्था नव्या रूपात पुनरुज्जीवित केली. ही कीर्तनप्रणाली जनजागृतीसंदर्भात अभूतपूर्व प्रभावशाली सिद्ध होत आली.

संत ज्ञानदेवांशी नामदेवांचे नाते 'जिवाच्या मैत्रा'चे होते. ज्ञानदेवांचा मार्ग योगप्रधान आत्मतोषाचा; तर नामदेवांचा मार्ग सर्वसमावेशक विठ्ठलभक्तीचा. तीर्थावळीच्या अखेरीस मावंद्याच्या निमित्ताने नामदेवांनी सहभोजनाचा घाट घातला, तेव्हा त्या वेळच्या काल्यातून ज्ञानदेवांना वारकरी-समतेचा साक्षात्कार झाला! त्या वेळी पहिल्यांदाच जातिवर्णांच्या भेदभावाला नामदेवांनी जाहीरपणे सुरुंग लावला होता. चोखामेळा, त्यांची महारी, त्यांचा पुत्र कर्ममेळा, दासी जनाबाई, गोरा कुंभार, जोगा परमानंद, सेना न्हावी, नरहरी सोनार अशी दलित व मागासवर्गीय कुटुंबे नामदेवांनी वर आणली. दीन-पतितांच्या कळवळ्यापायी त्यांनी पाचदा भारतभ्रमण केले. द्वारका, सौराष्ट्र, मारवाड, पंजाब, हरिद्वार, उत्तर भारत, मध्यभारत, दक्षिण भारत–अशी भ्रमंती करीत मानवोद्धारणाचा कार्यक्रम त्यांनी प्रभावीपणे राबविला. रामानंद, कबीर, त्रिलोचन, सुधन्वा, धन्ना, पीपा, रैदास, तुलसीदास आदींचे सांस्कृतिक कार्य संत नामदेवांच्या प्रभावातून बऱ्याच काळानंतर फुलून आले.

एकेश्वरी मुस्लिम संस्कृतीचे आक्रमण थोपविण्यासाठी त्यांनी मूर्तिपूजेपासून समाजमन परावृत्त करून निर्गुण-निराकार परमेश्वराची भक्ती पुरस्कारली. बहुदेववादाच्या जंजाळातून बाहेर काढून जनतेला एका देवाच्या ध्वजाखाली एकसंध-एकात्म– करण्याचे महत्कार्य सुरू केले. 'हरिनाम जाती हरिनाम पाती' याप्रमाणे सर्व भक्तांना संघटित करण्याचा प्रयत्न त्यांनी केला. तीर्थ, व्रत, दान, तप, यज्ञ आदी कर्मकाण्ड नामदेवांनी मोडीत काढले. शुष्क पांडित्य आणि दांभिकतेवर प्रखर कोरडे ओढले आणि तत्त्वबोधयुक्त सुटसुटीत मानवधर्म हा त्याही काळी जनमनावर प्रभावीपणे ठसविला. जातिधर्म-पंथादी सर्व भेदांपलीकडची मानवता आणि ज्ञानदृष्टी जागवीत केवळ स्वत:च्या हिंमतीवर नामदेवांनी उत्तर भारतात पाय रोवून निर्गुण भक्तीची ध्वजा फडकवली.

'संसारी असोनि नसावे'– असा सर्वोत्तम आणि सर्वसुलभ मध्यममार्ग नामदेवांनी समाजाला शिकवला. परमार्थाच्या नावावर बोकाळलेल्या भ्रामक समजुती आणि अनिष्ट रूढी यांचा त्यांनी खरपूस समाचार घेतला; इतकेच नव्हे, तर स्त्रीविषयक वर्तणुकीचे नीतिशिक्षणदेखील त्यांनी समाजाला दिले. असामान्य प्रज्ञा-प्रतिभा आणि अलौकिक प्रेम-कळवळा यांच्या बळावर नामदेवांनी आत्मोद्धार आणि लोकोद्धार यांसाठी सखोल विचार व








व्यापक प्रचार केला. त्यांच्या प्रबोधक साहित्याचे विषय अद्वैतप्रधान भक्तिकल्पना, प्रवृत्तिपर धर्मभावना, जातिपंथभेदांपलीकडील अध्यात्मदृष्टी, सर्वसमावेशक एकेश्वरवाद - हे होते. नामदेवांची लोकोद्धारचिंता, सर्वात्मक आत्मीयता, चारित्र्यशुचिता, भूतदयेची संवेदनशीलता, भक्तीची अनन्यता, ज्ञानाची प्रगल्भता या दैवी गुणांबरोबरच प्रचाराची गतिमानता यांतून नामदेवांची अमृतवाणी नवी अभंगपरंपरा बनून उदयास आली. प्रचारात उपयुक्त म्हणून चरित्र–आत्मचरित्र–आख्यान–भारूड–भूपाळी–आरती–गौळणी-भावकविता इ. प्रकारांचाही उपन्यास नामदेवांनी केला. आद्य कीर्तनकार, आत्मचरित्रकार, आख्यानक कवी आणि भावगीतकार म्हणूनही नामदेवांचे स्थान संस्मरणीय आहे. नामदेव हे थोर जनसाहित्यिक होते, यात शंका नाही. त्यांच्या काही रचना तर नवकाव्याचे स्मरण करून देणाऱ्या आहेत. नामदेवांचे सारे जीवनच काव्यमय होऊन गेले होते.

मंगळवेढ्याचे कुसू कोसळून बुरुजाखाली दबून मरण पावलेल्या अस्पृश्य संत चोखामेळा यांचे प्रेत मंगळवेढ्याहून पंढरपुरात वाजतगाजत आणून विठोबाच्या पायरीशी त्याची समाधी बांधणारा हा जननायक अखेरीस चोखोबाच्या त्या पायरीसमोरच स्वत:ची समाधी बांधण्याची व्यवस्था लावून गेला.

**संतकवी ज्ञानेश्वर–**

नवव्या शतकापासून नाथपंथाचा कार्यप्रभाव भारतभर गाजत होता. पण पुढे त्यात विकृती येत गेली. तेव्हा इतर पंथांमधून (चैतन्य, स्वरूप, आनंद, प्रकाश इ.) ग्राह्यांश स्वीकारून व नाथपंथाशी समन्वय करून ज्ञानदेवांनी (१३ वे शतक) भागवत धर्म (वैष्णव संप्रदाय) पुरस्कारला. सगुण भक्तीला अद्वैताचे अधिष्ठान देऊन डोळस बनविले. व्यक्तिनिष्ठ परमार्थसाधनेला त्यांनी लोकसंग्रहाची जोड दिल्यामुळे भागवतधर्मात नवचैतन्य येऊन वारकरी पंथ आंदोलनाच्या स्वरूपात पुढे आला. श्रीचक्रधरांपासून वाङ्मयीन मराठीच्या समृद्धीच्या सुरू झालेल्या कार्याची परिपूर्ती ज्ञानेश्वरांनी केली. जनसामान्यांच्या उपासनेला बहुदेववादापासून एकेश्वरवादाकडे व सकामतेकडून निष्कामतेकडे वळविण्याचे आणि यज्ञहिंसेसारख्या विकृती निषेधून सोपा श्रेयमार्ग विशद करण्याचे श्रेय ज्ञानदेवांकडे जाते. प्रवृत्तिपरता व निवृत्तिपरता यांच्या समन्वयाचा मार्ग ज्ञानेश्वरीद्वारे खुला झाला. अद्वैतनिष्ठ कर्मप्रधान भक्तियोग ही जीवनविषयक निष्ठा घेऊन मानवता, समता, विश्वबंधुता यांना प्रेरक असलेले अभेदभक्तीचे तत्त्वज्ञान ज्ञानदेवांनी निरूपिले. भागवत धर्माच्या झेंड्याखाली ब्राह्मणांपासून अतिशूद्रांपर्यंत साऱ्यांना एकत्र आणण्यात ज्ञानदेवांनी विलक्षण क्रांतदर्शित्व दाखविले. वैदिक ब्राह्मण्यवाद आणि औपनिषदिक किंवा बौद्ध मानवतावाद यांचा हा समन्वय होय. उपनिषदे, गीता, गौडपादकारिका, योगवासिष्ठ, शांकरमत, काश्मिरी शैव संप्रदाय आणि नाथसंप्रदाय या सप्तसिंधूंचे ओघ ज्ञानेश्वरीच्या अद्वैतसागरास येऊन मिळाले आहेत. ज्ञानेश्वरीत मायेला ब्रह्माची उपाधी न मानता चित्-शक्तिरूप मानल्यामुळे जगत-कर्तृत्वाची नीट व्यवस्था लावली गेली. शिवाय अभंगांमधून सगुण भक्तीचा पुरस्कार केल्यामुळे अद्वैतबोधाच्या तात्त्विक अधिष्ठानावरच साध्यासुध्या स्त्रीशूद्रांचीही सोय झाली. निर्गुणाची रूक्षता न येता समाजात सगुणाची सहृदयता वाढीस लागली. अध्यात्माधिष्ठित नीतिशास्त्र व अमृतमधुर मराठी भाषा यांचा ध्वज फडकवून भक्ती, ज्ञान व कर्म यांच्या समन्वयाची पूर्णाद्वैती तत्त्वज्ञानाची बैठक ज्ञानदेवांच्या साहित्याने निर्माण केली. त्यामुळे परमार्थमार्गातील साधकांचे तात्त्विक प्रबोधन होऊन त्यातून एक महान संतपरंपरा उदयास आली.

**संत कबीर–**

१५ व्या शतकात वेदान्ती धर्ममार्तंडांनी माजवलेल्या सांस्कृतिक अडगळीतल्या कितीतरी मानव्यविरोधी बाबींना ठाम नकार देण्याचे सामर्थ्य महात्मा कबीरांनी दाखविले. संत कबीर हे जनतेचे कवी, सत्याचे गायक, लोकनायक, ज्ञानी भक्त या वैशिष्ट्यांसह भारतभर बंडखोर संत म्हणून मान्यता पावलेले होते. १३९९ मध्ये काशी क्षेत्री एका मुसलमान विणकराला गंगातीरी सापडलेल्या व तिथेच बालपण व्यतीत केलेल्या कबीरांच्या गाठीशी धन, शिक्षण, सत्ता, वंशमहती यांपैकी काहीही नसताना त्यांनी त्यांच्या खास परखड काव्यशैलीद्वारे शतकभर प्रबोधनाचा जागर केला. त्यांनी भक्तिगुरू रामानंदांबरोबरच नाथपंथ, सूफी संप्रदाय यांचे भक्तिसूत्र पुढे चालवीत








स्पष्टपणे विवेकसामर्थ्याची कास धरली आणि त्यातूनच ते निर्गुण भक्तिधारेचे प्रवर्तक ठरले.

संत कबीरांनंतरच्या गुरूनानक, संत कवयित्री मीरा, संतश्रेष्ठ तुकाराम आदी थोर महात्म्यांवर संत कबीरांचा सर्वाधिक प्रभाव दिसतो. रामानंदांचे शिष्य सेना, पीपा, रविदास, धन्ना हे कबीरांचे गुरूबंधू असून सुधन्वा, बंका, कर्मा, सजन, मीरा आदी संतांबरोबरच संत नामदेवांचादेखील कबीरवाङ्मयात आदरपूर्वक उल्लेख करण्यात आलेला दिसतो. तात्त्विक विचारांचे व सात्त्विक आचाराचे प्रबळ समर्थक कबीर हे तथागत बुद्धाप्रमाणे मध्यममार्गाचे पुरस्कर्ते होते. शैव-वैष्णवादी पंथाचे आणि हिंदू-मुस्लिम धर्मांचे झगडे थांबविण्यासाठी त्यांनी भजनाच्या माध्यमातून जनजागृती करण्याचे योजिले आणि भजनाचे दौरे सुरू केले. कबीरांच्या भाषेत अवधी, ब्रज, पंजाबी, बिहारी आदी भाषांचा सहजमेळ दिसतो; अर्थात उत्तर भारतातील जनभाषेतच त्यांचे क्रांतिकारी आशयाचे प्रबोधक साहित्य निर्माण झाले असल्याने त्याला व्यापक जनआवाहन लाभले. समाजात समता-बंधुता वाढविण्यासाठी 'घटघट में' असलेल्या 'आत्मारामा'चा आधार त्यांनी घेतला. कायाक्लेष, मूर्तिपूजा, कर्मकाण्ड, यात्रा-याग आणि बाह्य वेष यांचा निषेध करीत, भक्तीलाच त्यांनी सर्व सुधारणांची जननी व क्रांतीची देवता बनवून सोडले. प्रेम व त्याग यांची मूर्ती असलेल्या संत कबीरांनी मानव-जीवनातील अनुचित बाबी, बाह्याचारी कर्मकांड आणि अमानवी रूढी यांची स्वरचित साखी, दोहे व पदे यांमधून परखड समीक्षा करीत धर्मपीठांपुढे आव्हान उभे केले.

प्रश्नशैली हे त्यांच्या साहित्याचे एक बलस्थान होते. जनतेविषयीच्या प्रामाणिक पोटतिडकीतून आणि स्वतःच्या अत्युच्च व्यक्तिगत चारित्र्यातून त्यांच्या अभंगवाणीत प्रचंड सामर्थ्य आले आहे. कथनी-करणी यांचा सुयोग्य मेळ, समर्पणाची कलंदर वृत्ती आणि विरक्तीची घरफूँक मस्ती– यांतून प्राप्त होणाऱ्या 'सहजसमाधाना' वर कबीरांचा 'योगसमाधी' पेक्षा अधिक भर होता. त्यामुळे त्यांच्या सहजप्रबोधनातूनही व्यसनमुक्ती, नीतिमूल्यांची जोपासना, अंधश्रद्धा निर्मूलन ही जनकल्याणाची कार्ये संपन्न झाली. अशा प्रकारे कबीरांची वाणी म्हणजे लोकशिक्षणाचा खजिनाच ठरला.

सन १५१८ साली म्हणजे स्वतःच्या अंतकाळी– 'नरकद्वार' समजल्या जाणाऱ्या मगहर येथे जाणीवपूर्वक जाऊन महात्मा कबीरांनी देह ठेवला. त्यांच्या मरणानंतर उत्तरक्रियाप्रसंगी हिंदू–मुसलमान यांमध्ये 'दहन की दफन?' यावर वाद निर्माण झाला, तेव्हा दोन्ही धर्मीयांनी आपापल्या रुचीनुसार त्यांच्या देहाची फुले नेऊन कबीरांची स्मारके आपापल्या गावी उभी केली.

**संतकवी एकनाथ–**

संत नामदेवांपासून संत एकनाथांपर्यंतचा सुमारे २०० वर्षांचा काळ तमोयुग म्हणण्याइतका असहनीय होता. राजकीय, सामाजिक, आर्थिक, धार्मिक अनाचार-अत्याचार–दुराचार सर्वत्र बोकाळला होता. दरम्यान दत्तसंप्रदायाचे पुनरुज्जीवन झाले होते खरे; पण वारकरी संप्रदाय अस्तंगत होत चालला होता. संत भानुदास, कान्होपात्रा, दामाजी हे निष्ठावंत वैष्णव अपवादात्मक उरले होते. त्यातून सन १५२८ मध्ये जन्मलेल्या संत एकनाथांनी वैचारिक व वाङ्मयीन वैभव निर्माण करून १६ व्या शतकाच्या महाराष्ट्राच्या सांस्कृतिक पुनरुज्जीवनाचे नेतृत्व सांभाळले. त्यांच्या सर्वसंग्राहक दृष्टीने व सर्वसमावेशक प्रतिभेने संस्कृतचे माहेरघर पैठण येथे संस्कृताभिमानी पंडितांच्या छाताडावर मायभाषा मराठीचा झेंडा उभारला. स्वतः दत्तसंप्रदायी असूनही त्या संप्रदायापेक्षा ज्ञानेश्वरांचा अध्यात्मनिष्ठ मानवतावाद अधिक रुचल्यामुळे संत एकनाथांनी वारकरी पंथाच्या पुनर्घटनेचे कार्य हाती घेतले. ('संतसाहित्याची सामाजिक फलश्रुती'– गं. बा. सरदार)

भोंदूगिरीने आणलेली मानसिक गुलामगिरी निषेधून सगुण-निर्गुण आणि हरि-हर यांचे ऐक्य पुरस्कारून नाथांनी समाजाला खरी भक्ती शिकवली, ती जनता जनार्दनाची. 'सर्वांभूती परमेश्वर' अनुभवण्याची अतिमानवता त्यांच्या चित्ती खच्चून भरली होती. 'नामधारकासी नाही वर्णावर्ण' हाच त्यांचा निःसंदिग्ध सिद्धान्त होता. समतेच्या विशुद्ध तत्त्वावर समाजाला आरूढ करण्याचा प्रयत्न त्यांनी साहित्यनिर्माणातून व प्रत्यक्ष आचरणातूनही केला. आत्महित, ऐहिक उन्नती व सामाजिक कर्तव्यबुद्धी यांच्यात साहचर्य असल्याची

त्यांची सशक्त धारणा त्यांच्या साहित्यातून ठायीठायी व्यक्त होते. जीवनव्यवहारात विवेक जागवणाऱ्या प्रबोधक सूचना त्यांनी त्यांच्या लेखनात ठिकठिकाणी पेरल्या. अतिरेक टाळून देहाचा साधनरूप उचित उपयोग करण्याची सम्यक् दृष्टी सर्व संतमंडळात केवळ नाथांनीच दिली. तसेच पापमूलक रूढींना तिलांजली देऊन स्वावलंबी प्रयत्नवाद आचरण्याचे बाळकडूही नाथांनीच आपल्या अनमोल साहित्यनिर्मितीतून जनसमाजाला दिले. ('जनसंस्कृतीचे आधारस्तंभ'- सुदाम सावरकर).

'भावार्थ रामायण' व 'भागवत' यांत नाथांनी नीतिमूल्यांचे विविधांगी दर्शन घडविले आहे. 'भागवत' हा तर मराठी जनसंस्कृतीचा जीवनवेधच असून, 'जनता हाच ईश्वर' हे तत्त्व त्यातून मोठ्याच उत्कटतेने प्रकट झालेले दिसते. अद्वैत वेदान्त लोकभाषेत सांगून त्यांनी खरा लोकधर्म लोकप्रिय केला. ब्रह्मज्ञानाची मिरास बाजूला सारून ज्ञान हे पृथ्वी, आकाश, वायू यांप्रमाणेच सर्वांच्या मालकीचे व सर्वांसाठी आहे, ही भावना जागृत केली. भागवताच्या रूपाने नाथांनी महाराष्ट्राला ज्ञानपूर्वक कर्मयोगाचा दिव्य संदेश दिला. निष्काम कर्माचा सिद्धान्त ज्ञानदेवांनंतर नाथांनीच एवढ्या ठामपणे जनमनावर बिंबविला.

'भावार्थ रामायणा' मधून आदर्श व मानवी सत्त्वाची सृष्टी उभारली गेली आहे. मराठी साहित्यात प्रथमच वीररसाचा प्रधान परिपोष नाथांनी यात साधला आहे. हे रामायण म्हणजे महाराष्ट्राचा प्रापंचिक आणि पारमार्थिक उषःकालच होय. त्याद्वारे नाथांनी समाजास भविष्य-काळासाठी कार्यक्षम केले.

मात्र त्याहीपेक्षा त्यांच्या भारुडांनी लोकधाटी शैलीत अगदी खालच्या थरापासून समाज आकर्षित करून घेऊन त्याला खेळकर, कार्यप्रवण व संघटित बनविले. भागवतातील बोध आम जनतेपर्यंत पोचविण्याचे कार्य त्यांच्या भारुडांनी प्रभावीपणे केले.

नाथांचे भाषिक कार्य असाधारण आहे. संस्कृत, मराठी व फारसीचे प्रवाह त्यांनी आपल्या रचनांत एकवटले. शांत व भक्तिरसांव्यतिरिक्त शृंगार, वीर, करुण रसांचे प्रवाह एकवटून त्यांनी पारंपरिक प्रबोधक काव्याचा एकांगीपणा नष्ट केला; तसेच बोलभाषेला बोधभाषेचा दर्जा दिला; समाजजीवनात तत्त्वज्ञान, धर्म, नीती, व्यवहार, साहित्य आदी सर्व अंगांचा तत्परतेने परामर्श घेतला. एकनाथांच्या प्रबोधक साहित्यातील तथा प्रत्यक्ष आचरणातील समाजोन्मुखता ही भागवत धर्माच्या इतिहासात तरी अपूर्व आहे (ह. श्री. शेणोलीकर).

**संतकवी तुकाराम–**

महाराष्ट्रातील संतकवींच्या परंपरेत तुकाराममहाराज वेगळेपणाने उमटून दिसतात. एका सामान्य प्रापंचिकाचा संत होण्याचा चलच्चित्रपट त्यांच्या उपलब्ध अभंगगाथेतून प्रतीत होतो. सन १६०८ मध्ये कुणबी मायबापांच्या पोटी देहूत जन्मलेल्या तुकारामाचे बालपण सुखात गेले; पण १६२९ मध्ये पडलेल्या भयानक दुष्काळात महाजनकी, जमीनजुमला व सगेसोयरे गमावल्याने तुकारामांना विरक्ती आली आणि तीर्थक्षेत्री भटकंती करून संसार त्यागून भामनाथ पर्वतात त्यांनी आत्मशोध घेत साधकावस्थेत १० वर्षे घालविली. त्यांच्या त्या अवस्थेतील सर्व मानसिक चढउतार अभंगवाणीत ग्रथित झाल्यामुळे तो आत्मीयतापूर्ण प्रबोधनाचा ठेवाच झाला आहे. नंतर तुकाराम प्रपंचात परतले व नेणत्या दुर्बळ जनांची सेवा करीत भक्तिमार्गात त्यांना पुढे नेऊ लागले. धर्माच्या ठेकेदारांना व रूढिग्रस्त उच्चवर्णीयांना ते सहन न होऊन त्यांचा अतोनात छळ (काव्याचे विकृतीकरण, शारीरिक कष्ट, चारित्र्यहनन, अनधिकार ज्ञानदानाचा मिथ्यारोप, धिंड, अभंगगाथेचे जलदिव्य इ.) करण्यात आला; परन्तु १३ दिवसांच्या निष्चक्राअखेरीस त्यांचे अभंग लोकगंगेत तरल्याने त्यांच्या वाणीलेखणीला अधिकच धार व झळाळी आली.

त्यांच्या प्रबोधनाचे स्वरूप 'प्रवृत्ती निवृत्तीचे आटुनिया भाग। उतरिले चांग रसायन।'- असे समावेशक व द्वंद्वातीत आहे. सज्जनांना परमार्थासह प्रपंचात स्थिर करणारी त्यांची शिकवण 'जोडुनिया धन उत्तम व्यवहारे। उदास विचारे वेच करी' - अशी नीतिवादी विवेकशील स्वरूपाची आहे.

चार-पाच हजार अभंग व काही पदे हे तुकोबांचे शेष वाङ्मय असून त्यांतील अद्वैतनिष्ठ भक्तिप्रधान कर्मयोगाचे तत्त्वज्ञान हे ज्ञानेश्वर-एकनाथादी संतांपेक्षा भिन्न नाही. ज्ञानोत्तर भक्तीचा सेवामय कर्मयोग हाच त्यांच्याही तत्त्वज्ञानाचा गाभा होय. त्यांचे साहित्य हा






एकाच वेळी हृदयस्थ परमात्म्याशी केलेला संवाद आहे, त्याच वेळी ते समाजबांधवांशी केलेले हितगूजही आहे. स्वानुभवाची दीप्ती आणि समाजजीवनाची अभिव्यक्ती यांच्या संयोगातून आलेले प्रबोधनाचे सौंदर्यसर्वस्व हे आंतरिक जिव्हाळ्यात असून संहितेत भाषा, वृत्त, कल्पना, भावना व आकांक्षा यांचा मनोहरी संयोग झाल्यामुळे तो मराठी वाग्देवतेचा बहुमोल अलंकारच बनून राहिला आहे. त्याने महाराष्ट्राचे सत्त्व जोपासत गेली ३५० वर्षे महाराष्ट्राची संस्कृती घडविली आहे.

तुकारामांच्या कालजयी लोकप्रियतेची कारणे त्यांच्या उत्स्फूर्त काव्यशक्तीत जशी आहेत, तशीच ती त्यांच्या समाजोन्मुख वृत्तीतही आहेत. आपल्या उत्स्फूर्त भक्तिपूत अशा रसाळ, सरळसोप्या पण अर्थगर्भ अभंगांतून त्यांनी जनतेत जागृती निर्माण केली व मृतवत् रूढींचे देव्हारे माजविणाऱ्या प्रतिगामी शक्तींशी दोन हात करण्याची झुंजारवृत्ती शिकविली. जनसामान्यांना त्यांनी इहनिष्ठ परमार्थ शिकविला. नरदेह, पार्थिवता, मृत्युलोक व लौकिक व्यवहार यांबद्दलच्या पारंपरिक तुच्छतावृत्तीऐवजी प्रवृत्ती-निवृत्तीचा सम्यक् समन्वय साधण्याची शिकवण दिली व लौकिक जीवनाचे उन्नयन साधण्याचा प्रबोधसोपान उभारला.

अर्थात संतश्रेष्ठ तुकारामांचे प्रबोधक साहित्य म्हणजे सामान्य जनतेसाठी उच्चतर जीवनमूल्यांची नवसृष्टीच होय. त्याने बुवाबाजी व चमत्कारवेडापासून जनतेला परावृत्त करून रोकडा प्रयत्नवाद शिकविला. यज्ञतप, योगयाग, व्रतवैकल्ये यांवर टीकास्त्र सोडून 'पुण्य–परोपकार। पाप ते परपीडा।' असा ठाम सिद्धान्त लोकांच्या गळी उतरविला. लोकभ्रम, रूढी व अज्ञानमूलक अनाचाराचा भंडाफोड केला. त्यांच्या अभंगांतील नीतिवचने विविध, विपुल व सर्वस्पर्शी आहेत. समाजधारणेला आवश्यक अशा शाश्वत नीतिमूल्यांचा पाठपुरावा करणाऱ्या या प्रबोधनपर साहित्यात 'नीती म्हणजेच भक्ती' अशी त्यांची धारणा असल्याचे जाणवते.

जनताजनार्दन हाच त्यांचा विश्वंभर असून 'विष्णुमय जग। वैष्णवांचा धर्म। भेदाभेद भ्रम। अमंगळ।।'– असा समतेचा उद्घोष त्यांच्या संपूर्ण प्रबोधक साहित्यातून उच्चरवाने होत असल्याचे जाणवते. जातिभेदामुळे व वर्गभेदामुळेही बहुजनांमध्ये आलेला न्यूनगंड घालवून समतावाद व ऐक्यभावनेचा परिपोष त्यांच्या प्रबोधक साहित्यातून साधला गेला आहे.

धूर्त समाजकंटकांना वठणीवर आणण्यासाठी त्यांनी शब्दांना शस्त्राची धार आणली व संकुचित दुराग्रह, दंभ आदींचा परखड शब्दांत समाचार घेतला. संतचरणरज म्हणवून घेणाऱ्या विनम्र तुकारामांनी दांभिकांसाठी मात्र आपल्या अभंगांमधून सिंहगर्जना केली. समाजधर्म आणि संन्यासधर्म यांची गल्लत न करता समाजाला विवेक तथा सत्त्वशीलतेची जोड दिली. इतकेच नव्हे, तर 'तुका म्हणे यश कीर्ती आणि मान। करिता जतन देव जोडे।।' अशी जयिष्णु जीवनाची आशा जनमनात प्रवर्तित केली. शौर्यहीन स्त्रीपुरुषांची निर्भर्त्सना करून शूरांचे गौरवगीत गायिले. 'क्षात्रधर्म' म्हणून प्रत्यक्ष युद्धधर्मसुद्धा पाइकांना शिकविला. महाराष्ट्राच्या स्वातंत्र्योदय काळातील पायाभरणीचे महत्कार्य सतत एक तपभर करणारी तुकोबारायांची ही भूमिका अद्वितीयच होय. तुकोबांच्या पायिकीच्या अभंगांनी व वीरश्रीपूर्ण कीर्तनांनी मावळ्यांमध्ये उतरलेल्या क्षमतेने परचक्रवेढ्यातून शिवरायाचा बचाव करून महाराष्ट्रावर मोठेच ऋण करून ठेवले आहे.

संतश्रेष्ठ तुकोबारायांच्या अशा या प्रबोधक साहित्याने महाराष्ट्राची जनसंस्कृतीच उजळून निघालेली आहे.

**गुरू गोविंदसिंह–**

शिखांच्या प्रमुख १० गुरूंमधले दहावे गुरू गोविंदसिंह हे जसे क्रांतिकारी जननेते होते, तसेच ते व्युत्पन्न सारस्वतही होते. अष्टपैलू व्यक्तिमत्त्वाच्या या जन-नायकाने लोककल्याणाच्या पोटतिडकीतून दहा ग्रंथ, दोन कवितासंग्रह आणि चरित्रे-आत्मचरित्रे निर्माण केली आणि शेकडो देशप्रेमी व धर्मप्रेमी युवकांना 'चण्डी-चरित्रा'द्वारे प्रेरणा देऊन त्यांच्यात आत्मविश्वास व कार्यस्फूर्ती प्रवर्तित केली. मृत्यूला कवटाळण्याच्या कसोटीवर निवडलेल्या युवकांच्या 'खालसा' या धर्मसत्तेच्या बळावर त्याने मानवधर्मावरील इस्लामचे आक्रमण परतवून लावले; परन्तु इस्लाम तथा अन्यही प्रचलित धर्मांचा, भाषांचा वा विविध प्रचलित सांप्रदायिकांचा द्वेष मात्र केला नाही. पूरबी, पश्चिमी, आरबी, फिरंगी, कुरेशी, कंधारी, मिलंगी, बंगाली, सहेले,

त्यांची सशक्त धारणा त्यांच्या साहित्यातून ठायीठायी व्यक्त होते. जीवनव्यवहारात विवेक जागवणाऱ्या प्रबोधक सूचना त्यांनी त्यांच्या लेखनात ठिकठिकाणी पेरल्या. अतिरेक टाळून देहाचा साधनरूप उचित उपयोग करण्याची सम्यक् दृष्टी सर्व संतमंडळात केवळ नाथांनीच दिली. तसेच पापमूलक रूढींना तिलांजली देऊन स्वावलंबी प्रयत्नवाद आचरण्याचे बाळकडूही नाथांनीच आपल्या अनमोल साहित्यनिर्मितीतून जनसमाजाला दिले. ('जनसंस्कृतीचे आधारस्तंभ'– सुदाम सावरकर).

'भावार्थ रामायण' व 'भागवत' यांत नाथांनी नीतिमूल्यांचे विविधांगी दर्शन घडविले आहे. 'भागवत' हा तर मराठी जनसंस्कृतीचा जीवनवेधच असून, 'जनता हाच ईश्वर' हे तत्त्व त्यातून मोठ्याच उत्कटतेने प्रकट झालेले दिसते. अद्वैत वेदान्त लोकभाषेत सांगून त्यांनी खरा लोकधर्म लोकप्रिय केला. ब्रह्मज्ञानाची मिरास बाजूला सारून ज्ञान हे पृथ्वी, आकाश, वायू यांप्रमाणेच सर्वांच्या मालकीचे व सर्वांसाठी आहे, ही भावना जागृत केली. भागवताच्या रूपाने नाथांनी महाराष्ट्राला ज्ञानपूर्वक कर्मयोगाचा दिव्य संदेश दिला. निष्काम कर्माचा सिद्धान्त ज्ञानदेवांनंतर नाथांनीच एवढ्या ठामपणे जनमनावर बिंबविला.

'भावार्थ रामायणा' मधून आदर्श व मानवी सत्त्वाची सृष्टी उभारली गेली आहे. मराठी साहित्यात प्रथमच वीररसाचा प्रधान परिपोष नाथांनी यात साधला आहे. हे रामायण म्हणजे महाराष्ट्राचा प्रापंचिक आणि पारमार्थिक उषःकालच होय. त्याद्वारे नाथांनी समाजास भविष्यकाळासाठी कार्यक्षम केले.

मात्र त्याहीपेक्षा त्यांच्या भारुडांनी लोकधाटी शैलीत अगदी खालच्या थरापासून समाज आकर्षित करून घेऊन त्याला खेळकर, कार्यप्रवण व संघटित बनविले. भागवतातील बोध आम जनतेपर्यंत पोचविण्याचे कार्य त्यांच्या भारुडांनी प्रभावीपणे केले.

नाथांचे भाषिक कार्य असाधारण आहे. संस्कृत, मराठी व फारसीचे प्रवाह त्यांनी आपल्या रचनांत एकवटले. शांत व भक्तिरसांव्यतिरिक्त शृंगार, वीर, करुण रसांचे प्रवाह एकवटून त्यांनी पारंपरिक प्रबोधक काव्याचा एकांगीपणा नष्ट केला; तसेच बोलभाषेला बोधभाषेचा दर्जा दिला; समाजजीवनात तत्त्वज्ञान, धर्म, नीती, व्यवहार, साहित्य आदी सर्व अंगांचा तत्परतेने परामर्श घेतला. एकनाथांच्या प्रबोधक साहित्यातील तथा प्रत्यक्ष आचरणातील समाजोन्मुखता ही भागवत धर्माच्या इतिहासात तरी अपूर्व आहे (ह. श्री. शेणोलीकर).

**संतकवी तुकाराम–**

महाराष्ट्रातील संतकवींच्या परंपरेत तुकाराममहाराज वेगळेपणाने उमटून दिसतात. एका सामान्य प्रापंचिकाचा संत होण्याचा चलच्चित्रपट त्यांच्या उपलब्ध अभंगगाथेतून प्रतीत होतो. सन १६०८ मध्ये कुणबी मायबापांच्या पोटी देहूत जन्मलेल्या तुकारामाचे बालपण सुखात गेले; पण १६२९ मध्ये पडलेल्या भयानक दुष्काळात महाजनकी, जमीनजुमला व सगेसोयरे गमावल्याने तुकारामांना विरक्ती आली आणि तीर्थक्षेत्री भटकंती करून संसार त्यागून भामनाथ पर्वतात त्यांनी आत्मशोध घेत साधकावस्थेत १० वर्षे घालविली. त्यांच्या त्या अवस्थेतील सर्व मानसिक चढउतार अभंगवाणीत ग्रथित झाल्यामुळे तो आत्मीयतापूर्ण प्रबोधनाचा ठेवाच झाला आहे. नंतर तुकाराम प्रपंचात परतले व नेणत्या दुर्बळ जनांची सेवा करीत भक्तिमार्गात त्यांना पुढे नेऊ लागले. धर्माच्या ठेकेदारांना व रूढिग्रस्त उच्चवर्णीयांना ते सहन न होऊन त्यांचा अतोनात छळ (काव्याचे विकृतीकरण, शारीरिक कष्ट, चारित्र्यहनन, अनधिकार ज्ञानदानाचा मिथ्यारोप, धिंड, अभंगगाथेचे जलदिव्य इ.) करण्यात आला; परन्तु १३ दिवसांच्या निष्पक्राअखेरीस त्यांचे अभंग लोकगंगेत तरल्याने त्यांच्या वाणीलेखणीला अधिकच धार व झळाळी आली.

त्यांच्या प्रबोधनाचे स्वरूप 'प्रवृत्ती निवृत्तीचे आटुनिया भाग। उतरिले चांग रसायन।'– असे समावेशक व द्वंद्वातीत आहे. सज्जनांना परमार्थासह प्रपंचात स्थिर करणारी त्यांची शिकवण 'जोडुनिया धन उत्तम व्यवहारे। उदास विचारे वेच करी' – अशी नीतिवादी विवेकशील स्वरूपाची आहे.

चार-पाच हजार अभंग व काही पदे हे तुकोबांचे शेष वाङ्मय असून त्यांतील अद्वैतनिष्ठ भक्तिप्रधान कर्मयोगाचे तत्त्वज्ञान हे ज्ञानेश्वर–एकनाथादी संतांपेक्षा भिन्न नाही. ज्ञानोत्तर भक्तीचा सेवामय कर्मयोग हाच त्यांच्याही तत्त्वज्ञानाचा गाभा होय. त्यांचे साहित्य हा

एकाच वेळी हृदयस्थ परमात्म्याशी केलेला संवाद आहे, त्याच वेळी ते समाजबांधवांशी केलेले हितगूजही आहे. स्वानुभवाची दीप्ती आणि समाजजीवनाची अभिव्यक्ती यांच्या संयोगातून आलेले प्रबोधनाचे सौंदर्यसर्वस्व हे आंतरिक जिव्हाळ्यात असून संहितेत भाषा, वृत्त, कल्पना, भावना व आकांक्षा यांचा मनोहरी संयोग झाल्यामुळे तो मराठी वाग्देवतेचा बहुमोल अलंकारच बनून राहिला आहे. त्याने महाराष्ट्राचे सत्त्व जोपासत गेली ३५० वर्षे महाराष्ट्राची संस्कृती घडविली आहे.

तुकारामांच्या कालजयी लोकप्रियतेची कारणे त्यांच्या उत्स्फूर्त काव्यशक्तीत जशी आहेत, तशीच ती त्यांच्या समाजोन्मुख वृत्तीतही आहेत. आपल्या उत्स्फूर्त भक्तिपूत अशा रसाळ, सरळसोप्या पण अर्थगर्भ अभंगांतून त्यांनी जनतेत जागृती निर्माण केली व मृतवत् रूढींचे देव्हारे माजविणाऱ्या प्रतिगामी शक्तींशी दोन हात करण्याची झुंजारवृत्ती शिकविली. जनसामान्यांना त्यांनी इहनिष्ठ परमार्थ शिकविला. नरदेह, पार्थिवता, मृत्युलोक व लौकिक व्यवहार यांबद्दलच्या पारंपरिक तुच्छतावृत्तीऐवजी प्रवृत्ती-निवृत्तीचा सम्यक् समन्वय साधण्याची शिकवण दिली व लौकिक जीवनाचे उन्नयन साधण्याचा प्रबोधसोपान उभारला.

अर्थात संतश्रेष्ठ तुकारामांचे प्रबोधक साहित्य म्हणजे सामान्य जनतेसाठी उच्चतर जीवनमूल्यांची नवसृष्टीच होय. त्याने बुवाबाजी व चमत्कारवेडापासून जनतेला परावृत्त करून रोकडा प्रयत्नवाद शिकविला. यज्ञतप, योगयाग, व्रतवैकल्ये यांवर टीकास्त्र सोडून 'पुण्य–परोपकार। पाप ते परपीडा।' असा ठाम सिद्धान्त लोकांच्या गळी उतरविला. लोकभ्रम, रूढी व अज्ञानमूलक अनाचाराचा भंडाफोड केला. त्यांच्या अभंगांतील नीतिवचने विविध, विपुल व सर्वस्पर्शी आहेत. समाजधारणेला आवश्यक अशा शाश्वत नीतिमूल्यांचा पाठपुरावा करणाऱ्या या प्रबोधनपर साहित्यात 'नीती म्हणजेच भक्ती' अशी त्यांची धारणा असल्याचे जाणवते.

जनताजनार्दन हाच त्यांचा विश्वंभर असून 'विष्णुमय जग। वैष्णवांचा धर्म। भेदाभेद भ्रम। अमंगळ।।'– असा समतेचा उद्घोष त्यांच्या संपूर्ण प्रबोधक साहित्यातून उच्चरवाने होत असल्याचे जाणवते. जातिभेदामुळे व वर्गभेदामुळेही बहुजनांमध्ये आलेला न्यूनगंड घालवून समतावाद व ऐक्यभावनेचा परिपोष त्यांच्या प्रबोधक साहित्यातून साधला गेला आहे.

धूर्त समाजकंटकांना वठणीवर आणण्यासाठी त्यांनी शब्दांना शस्त्राची धार आणली व संकुचित दुराग्रह, दंभ आदींचा परखड शब्दांत समाचार घेतला. संतचरणरज म्हणवून घेणाऱ्या विनम्र तुकारामांनी दांभिकांसाठी मात्र आपल्या अभंगांमधून सिंहगर्जना केली. समाजधर्म आणि संन्यासधर्म यांची गल्लत न करता समाजाला विवेक तथा सत्त्वशीलतेची जोड दिली. इतकेच नव्हे, तर 'तुका म्हणे यश कीर्ती आणि मान। करिता जतन देव जोडे।।' अशी जयिष्णु जीवनाची आशा जनमनात प्रवर्तित केली. शौर्यहीन स्त्रीपुरुषांची निर्भर्त्सना करून शूरांचे गौरवगीत गायिले. 'क्षात्रधर्म' म्हणून प्रत्यक्ष युद्धधर्मसुद्धा पाइकांना शिकविला. महाराष्ट्राच्या स्वातंत्र्योदय काळातील पायाभरणीचे महत्कार्य सतत एक तपभर करणारी तुकोबारायांची ही भूमिका अद्वितीयच होय. तुकोबांच्या पायिकीच्या अभंगांनी व वीरश्रीपूर्ण कीर्तनांनी मावळ्यांमध्ये उतरलेल्या क्षमतेने परचक्रवेढ्यातून शिवरायाचा बचाव करून महाराष्ट्रावर मोठेच ऋण करून ठेवले आहे.

संतश्रेष्ठ तुकोबारायांच्या अशा या प्रबोधक साहित्याने महाराष्ट्राची जनसंस्कृतीच उजळून निघालेली आहे.

**गुरू गोविंदसिंह–**

शिखांच्या प्रमुख १० गुरूंमधले दहावे गुरू गोविंदसिंह हे जसे क्रांतिकारी जननेते होते, तसेच ते व्युत्पन्न सारस्वतही होते. अष्टपैलू व्यक्तिमत्त्वाच्या या जन-नायकाने लोककल्याणाच्या पोटतिडकीतून दहा ग्रंथ, दोन कवितासंग्रह आणि चरित्रे-आत्मचरित्रे निर्माण केली आणि शेकडो देशप्रेमी व धर्मप्रेमी युवकांना 'चण्डी-चरित्रा'द्वारे प्रेरणा देऊन त्यांच्यात आत्मविश्वास व कार्यस्फूर्ती प्रवर्तित केली. मृत्यूला कवटाळण्याच्या कसोटीवर निवडलेल्या युवकांच्या 'खालसा' या धर्मसत्तेच्या बळावर त्याने मानवधर्मावरील इस्लामचे आक्रमण परतवून लावले; परन्तु इस्लाम तथा अन्यही प्रचलित धर्मांचा, भाषांचा वा विविध प्रचलित सांप्रदायिकांचा द्वेष मात्र केला नाही. पूरबी, पश्चिमी, आरबी, फिरंगी, कुरेशी, कंधारी, मिलंगी, बंगाली, सहेले,

बुंदेले, मरहटा, मघेले, हसब्बी, हलब्बी, फरासिस, हिंगुला, चीनम्, तिब्बती आदी सर्व देशभाषांतल्या विभूतींचा त्यांनी त्यांच्या काव्यात सारखाच आदर केला. सारे मानव एकरूप आहेत; वर्ण–आश्रम–पंथ–धर्म आदींच्या भिन्नतेमुळे माणूस भिन्न होत नाही – असे स्पष्ट प्रतिपादन केले; 'एक जात एक ज्योत' व एक देव मानणारा त्यांचा धर्म कृत्रिम भेदभाव ओलांडून शुद्ध मानवधर्म म्हणून; खालसा, सिंह – किंवा शिष्यधर्म म्हणून पुढे आणला :

गुरूघर जनम तुम्हारा होये ।
पिछले जातिबरण सब खोये ।।
चार बरण के एको भाई।
धर्म खालसा पदवी पाये।।

दानाहून दयेला त्यात विशेष महत्त्व असून, त्यांच्या मते दयेचा अर्थ असा–

'दीनन का प्रतिपाल करे बिन' – यज्ञयाग फोल आहे; कायाक्लेष व्यर्थ आहेत; तीर्थभ्रमण अनावश्यक आहे; मूर्ती, लिंग, ताबूत वगैरे प्रतिमा तर मिथ्याधर्माच्या द्योतक आहेतच; पण बहुदेवपूजनही निषिद्धच आहे. एकेश्वराची प्रेमभक्ती तेवढी त्यांना मान्य असून ती-देखील 'अलख पुरक अविगामी। सब घट घट के अंतरजामी' अशा एका सत्येश्वराचीच असायला हवी. दांभिकांच्या बुवाबाजीचा त्यांनी कठोर शब्दांत निषेध केला आहे, इतकेच नव्हे तर समाजात रूढ असलेली गुरूपरंपरादेखील त्यांनी बंद केली असून विशुद्ध संतवाणी ('गुरूग्रंथ साहब') हाच जनतेचा गुरू मानून जीवनात कृतिवीर व्हावे, यावर गुरू गोविंदसिंहांचा कटाक्ष होता.

'पख्याने त्रियाचरित्र' – या ग्रंथात त्यांनी ४०५ आदर्श स्त्रियांची चरित्रे पुढे आणून सतीप्रथा, स्त्रियांची विक्री, बालिकांची हत्या यांच्या विरोधात संपूर्ण शीख समाजाची मानसिकता तयार केली व महिलांचीही जागृती केली. 'जापजी', 'विचित्र नाटक', 'ज्ञानप्रबोध', 'चण्डीचरित्र' हे गद्य ग्रंथ, 'जफरनामा' व 'हिकायते' हे काव्यग्रंथ, 'सर्वलोहप्रकाश' हा दीर्घकाय ग्रंथ– हे सर्वच प्रबोधनाची गुणवत्ता धारण केलेले गुरू गोविंदसिंहांचे वाङ्मय होय.

## (३) वैदर्भीय संतसारस्वतांचे प्रबोधनपर साहित्य

विदर्भ ही भौगोलिकता व नैसर्गिक साधनसंपत्तीच्या बाबतीत संपन्न अशी भूमी आहे. प्राचीन काळातील अगस्ति, गृत्समद, कौंडिण्य, कण्व, मार्कंडेय, करंज आदी ऋषिमुनींची ही कर्मभूमी आहे. दत्त, अवधूत, नाथ महात्मे, कविकुलगुरू, विज्ञानवेत्ते, नारीरत्ने यांनीही या भूमीला तात्त्विक आणि व्यावहारिक माहात्म्य प्रदान केले आहे. या भूमीवर लोकजीवनाचे संधारण, विकसन आणि व्यवस्थापन साधणारे संतमहात्मे आणि जननायक प्राचीन-मध्ययुगीन काळापासून जन्म घेत आले आहेत. वैदिक, जैन, बौद्ध, शीख, मुस्लिम, यहुदी, पारशी, ख्रिस्ती धर्मवेत्ते व धर्मप्रसारकांनीही वेगवेगळ्या जीवन-धारक विचारप्रणाली येथे आणून ओतल्या. त्यांतील भारतीय विचारसूत्रांची गुंफण असलेल्या वैदिक, जैन, बौद्ध व शीख धर्मविचारांच्या अनुरोधाने एतद्देशीय संतमहात्म्यांनी जो जीवनधारक तत्त्वविचार जनसामान्यां-पर्यंत पोचविण्याचा प्रयत्न केला, त्या प्रयत्नांची माध्यमे प्राय: गद्य-पद्य साहित्य, गीत, संगीत, नृत्य, कीर्तन-प्रवचन, लोकनाट्य ही राहिली आहेत. जनप्रबोधनाची वा लोकशिक्षणाची ही माध्यमे परंपरागत चालत आली असली, तरी प्रत्येक जननायकाने त्या त्या काळाची निकड लक्षात घेऊन त्यांना स्वभावधर्मानुकूल वळण दिले आहे.

तथागत गौतम बुद्ध, गुरू गोरक्षनाथ, महात्मा बसवेश्वर, संत कबीर, गुरू गोविंदसिंह आदी महाराष्ट्राबाहेरच्या संतमहात्म्यांनी जी शिकवण साहित्य-निर्मितीद्वारे व प्रत्यक्ष कार्याद्वारे दिली, तिचा प्रभाव आत्मसात करून संत नामदेव, श्रीज्ञानदेव, संत एकनाथ, संत तुकाराम आदींनी महाराष्ट्रीयांची संवेदकता ध्यानात घेऊन लोकशिक्षणाची उचित माध्यमे निवडली व जोपासली. विदर्भ ह्या मध्यभारतात स्थित असलेल्या प्रदेशाशी महाराष्ट्राची तथा उत्तर-दक्षिण भारताची सारखीच जवळीक असल्याने देशभरातल्या विविध संत-महात्म्यांच्या भिन्न भिन्न विचारसरणींचा मेळ इथे घडून आला आणि त्यातून विदर्भातील संतांचे प्रबोधनकार्य तसेच प्रबोधक साहित्य आकारास आले. विदर्भातील संतमहात्म्यांमध्ये मराठीचे आद्यकवी मुकुंदराज, महानुभाव पंथप्रवर्तक श्रीचक्रधर

(निर्वाण सन १२७८), संतकवी श्रीअमृतराय (सन १६९८), नाथसंप्रदायाचे देवनाथ-दयाळनाथ (सन १७८४), अवधूत संप्रदायाचे कृष्णाजी-श्रावण महाराज (सन १८००), झामसिंग महाराज, सीताराम गुर्जर गामोट, बालाजी महाराज (सन १८८५), प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराज (१८८१), तपोमूर्ती श्री गाडगेबाबा (सन १८७६), 'अजात' प्रवर्तक श्री गणपती महाराज (सन १८८७), श्री नानाजी महाराज (सन १८८८), श्री तुकडोजी महाराज (१९०९) यांचे प्रबोधनपर कार्य लक्षणीय आहे.

**आद्यकवी श्री मुकुंदराज–**

मराठीचे आद्यकवी श्री मुकुंदराज यांचे 'विवेकसिंधू' (सन ११८८) व 'परामामृत' हे दोन तात्त्विक ग्रंथ प्रसिद्ध असून संस्कृतऐवजी मराठी बोलीभाषेतून त्यांनी वेदान्तज्ञानाची गंगा जनतेच्या दारापर्यंत पोचविली. मुकुंदराजांचे गुरू हरिनाथ महाराज असून त्यांची जन्मभूमी भंडारा जिल्ह्यातील अंभोरा गावी आंब आणि वैनगंगा नद्यांच्या संगमावर आहे. मुकुंदराज वाराणसीहून बैतुलला आले व जैतपाळ राजाला ईश्वरी साक्षात्कार घडवून दिल्यानंतर त्याचे राजगुरू बनून तेथेच राहिले. त्यामुळे त्यांचे कार्यक्षेत्र हे विदर्भच राहिले. त्यांची समाधी बैतुलजवळच्या खेडला गावात आहे. दुसरीही एक समाधी मराठवाड्यात अंबाजोगाई येथे दाखवण्यात येते. मुकुंदराज-विरचित हे दोन्ही ग्रंथ अद्वैत वेदान्ती तत्त्वप्रणालीचेच निरूपण करणारे असून त्यातील प्रबोधनाचा विषय पारमार्थिक आहे; ऐहिक नाही. आध्यात्मिक जीवनमार्गाला अनुसरून मानव-जीवनाची आचरणसंहिता/नैतिकता जोपासणे, हेच ह्या प्रबोधनाचे लक्ष्य आहे.

**सर्वज्ञ श्रीचक्रधर–**

सर्वज्ञ श्रीचक्रधर हे महाप्रभावी जननायक असून ते म्हणजे एक चालतेबोलते प्रबोधनच होते. ते दीनदुबळ्यांना धार्मिक व सामाजिक लुटारूंपासून सोडवून खरा परमार्थ-मार्ग दर्शवीत होते. त्यांच्या हृदयात जीवोद्धारणाची अनिवार तळमळ होती. त्याचबरोबर जीवांचे हृदयपरिवर्तन करतानाही आग्रही तीव्रता नसून सर्वसमावेशक महात्मताच होती. आपला प्रबोधक संदेश ते स्वतः गावागावाला जाऊन पोचवीत. उपदेशासाठी मराठी बोलीचाच आग्रह धरून त्यांनी मराठी/वऱ्हाडी बोलीभाषेला धर्मभाषेचा दर्जा मिळवून दिला. सामान्य जनतेला-विशेषतः स्त्रीशूद्रांना- धार्मिक अधिकार आणि सामाजिक समता देणारी त्यांची तत्त्वप्रणाली लोकप्रिय होऊ लागली, इतकेच नव्हे तर ती विद्वानांनाही मान्य होऊ लागली. म्हाईंभटांनी 'लीळाचरित्रा'त (सन १२७८) या जनसारस्वत जन-नायकाचे प्रबोधक निरूपण साक्षेपपूर्वक ग्रंथित केले आहे. त्यानुसार भिन्न भिन्न देवांची उपासना, देहक्लेश, व्रतोपासना, वर्णभेद, स्त्रीपुरुषभेद, स्पृश्यास्पृश्यता इ. विषमतामूलक बाबी अमान्य करून प्रेमभावाने समाजात नवचैतन्य जागवले.

**संतकवी अमृतराय–**

संतकवी अमृतराय (सन १६९८) यांचा मराठीइतकाच संस्कृत, हिंदी, फारसी आदी भाषांचा अभ्यास असून हिंदी-मराठीतील त्यांच्या प्रासादिक काव्यात भक्तिरस ओतप्रोत भरला आहे. बुलडाणा जिल्ह्यातील मेहकर तालुक्यातील साखरखेडुरले येथे कुळकर्ण्यांघरी जन्मलेल्या अमृतरायांनी पाव शतकाहून अधिक काळ जनताजनार्दनाला आपली कीर्तनसेवा अर्पिली. मराठेशाही, पेशवेशाही, निजामशाही यांच्या सत्तासंघर्षकाळात अमृतरायांची रसाळ कीर्तने महाराष्ट्रात गाजली. आदर्श प्रापंचिक, राजसत्ताधारी विद्वान व भक्तिसंपन्न पुरुष यांबरोबरच भारतभ्रमण, धर्मसाहित्यवाचन आणि मध्वमुनींचा १२ वर्षे सहवास यांतून घडलेल्या या चतुरस्र व्यक्तित्वाचा सुमधुर आविष्कार शोभेल अशाच त्यांच्या भक्तिपर पदरचना, गजलरचना आहेत. त्यातून या संततुल्य कवीने परमार्थाच्या पायावर सात्त्विक व भक्तिपर अशा प्रबोधनप्रधान पदरचना साधल्या.

**देवनाथ/दयाळनाथ–**

संत एकनाथ महाराजांच्या शिष्यपरंपरेतील देवनाथ (सन १७८४) हे सुर्जी-अंजनगाव येथे गुरू गोविंदनाथांना भेटले असता त्यांनीच त्यांचे हे नामकरण केले. भारतभर प्रवास केलेल्या देवनाथांनी ६७ वर्षांच्या हयातीत उत्तम प्रासादिक कविता लिहिली असून तिच्याद्वारे पारमार्थिक भक्तिमार्गी प्रबोधनाचा नाथांचा वारसा त्यांनी सांभाळला. त्यांचे शिष्य दयाळनाथ हे श्रेष्ठ प्रतीचे आख्यानक कवी होते. या गुरुशिष्यांच्या रचनांमधील शब्दसौष्ठव, पदलालित्य व अर्थगांभीर्य रसपूर्ण असून दयाळनाथांच्या कवितेत

तर नवनवीन कल्पना आढळतात. नाथपरंपरेचे वारस श्री गोविंदनाथ, देवनाथ, दयाळनाथ हे तिघेही वैराग्यमूर्ती असून 'नाथांचा सोटा' त्रैलोक्यात फिरवणारे बहाद्दर होते. तिघांनीही विदर्भभूमीला पावन केले. त्यांच्याव्यतिरिक्त गुरू रंगनाथ, गोपाळनाथ, गोविंदनाथ, भालचंद्रनाथ आदींची काव्यरचना अद्याप अप्रकाशित आहे.

धर्मातीतता, जात्यातीतता, कर्मकाण्डनिषेध, भूतदया आणि वेदप्रामाण्य या नाथतत्त्वप्रणीत गुणांमुळे त्यांच्या प्रबोधनपर रचना समतावादी मानवधर्माधिष्ठित समाजधारणेला बळ पुरवणाऱ्या उतरल्या आहेत.

**श्री झामसिंग महाराज –**

आर्वीचे संतकवी झामसिंग महाराज (चव्हाण राणा) हे सेवानिवृत्त नाझर असून 'ब्रह्मविचार' (सन १९०३) व 'श्रीगुरुवरदेश्वरी' (सन १९१८) हे दोन ग्रंथ लिहून त्यांनी जनजागृती केली. विदर्भात आपल्या प्रभावाने त्यांनी मोठा जनसमाज परमार्थप्रवण केला. वरदेश्वरीत आर्या, साकी, दिंडी वृत्तांबरोबर पद, कटाव, ओव्या, चौपायाही असून त्यांची रचना प्रौढ व माधुर्ययुक्त आहे. 'सच्चित आनंदा। आत्मारामा सुखकंदा' - ही प्रसिद्ध आरती झामसिंग महाराजांचीच रचना होय.

**श्री कृष्णाजी महाराज –**

अवधूत पंथप्रवर्तक श्री कृष्णाजी महाराज सन १८०० मध्येच काशीहून पंढरपूरला आले व अखेरीस विदर्भात सावंग्याला येऊन पोचले. ४५वर्षे अवधूती भजनांनी त्यांनी सामान्य जनतेत जागृती आणली. श्री हेंगळूजीमहाराजांसह अवधूत पंथाची ध्वजा फडकविणारे कृष्णाजी महाराज यांनी सत्ययुग व निष्कलंक अवतार यांच्या संबंधात भजनांमधून भविष्यवाणी केलेली आहे. जनतेला भविष्यातील आशादायी प्रकाश दाखवून धीर देत त्यांनी सावंग्याला प्रचंड झेंडे फडकविले. मंदिरात मूर्तीऐवजी अधिष्ठान स्थापिले. झांजांवर भजने गाऊन मागास जनतेचे उद्‌बोधन केले. सांकेतिकतेने भारलेल्या बोलभाषेतील त्यांच्या सुगम वाणीने गावपरिसर जागा केला.

पहूर येथील योगी श्री श्रावणजी उमरंतकर महाराज (१९०४) यांनी कीर्तनांद्वारे अवधूतपंथाचे प्रभावी प्रचारकार्य केले. कृष्णाजी महाराजांच्या वाणीचे मर्म ते कीर्तनातून स्पष्ट करीत.

**श्री सीताराम गुर्जर –**

संतकवी श्री सीताराम गुर्जर गामोट हे 'नसकरी महाराज' या नावाने प्रसिद्धीस आले. पाळोदा गुजरातेतून ते आर्वीला आले, तिथेच रमले. त्यांनी एकूण पाच ग्रंथ लिहिले असून त्यांतील 'भक्तमहिमामृत' या सव्वासहा हजार ओव्यांच्या ग्रंथात विदर्भातील ३३ संतांची चरित्रे त्यांनी रसाळ अशा ओवीछंदात लिहिली आहेत. त्यांतील संत मायबाई या ज्ञानेश्वर महाराजांच्या परंपरेतील हैबतीनाथांच्या कृपापात्र असून त्या परमहंस श्री आडकोजी महाराज (वरखेड) यांच्या गुरू होत.

**श्री बालाजी महाराज –**

श्री बालाजी महाराज (सन १८८५) हे नागपूर येथील प्रापंचिक असून शिल्पकार होते. सन १९२० साली चंद्रपूरच्या औलिया गैबीशहाच्या कृपेने त्यांचे जीवन बदलले. कन्हान नदीच्या तीरावर योगाभ्यास करून त्यांनी रामनगर–खापा परिसरातील निराधार व वाट चुकलेल्यांना योग्य जीवनमार्गावर लावले. जातपातच नव्हे तर हिंदु-मुस्लिम धर्मांतला भेदभावही त्यांना मान्य नव्हता. त्यांची 'आत्मप्रकाश' ही मराठीतील व 'भक्तिसिंधु' ही हिंदीतील भजनावली आणि 'अभंगसरिता' ही अभंगावली प्रसिद्ध आहे.

**श्री गुलाबराव महाराज –**

माधानची अलौकिक संतविभूती श्री गुलाबराव महाराज (इ. स. १८८१) म्हणजे पारमार्थिक ज्ञानक्षेत्रातील एक खरेखुरे आश्चर्य आहे. बालांध असूनही ते उपजतच सिद्ध–महाज्ञानी होते. सर्व विद्या आणि शास्त्रे यांचे गुह्याद्‌गुह्यतर रहस्य त्यांच्या मुखातून स्वयमेव, नित्य व अस्खलित प्रकट होई. कोणताही विषय समजावून सांगण्याची त्यांची शैली सप्रमाण, सशास्त्र, तर्कशुद्ध असून त्यांची सुमारे १३० प्रकरणांची निर्मिती आश्चर्यकारक आहे. मराठी, हिंदी, संस्कृत भाषांतील त्यांचे ग्रंथ तात्त्विक चर्चेचे उत्कृष्ट नमुने होत. त्यांच्या ग्रंथाची भाषा अत्यंत सरळ, प्रासादिक व प्रतिभापूत आहे. त्यांच्या हयातीतील सर्वांगामी बुद्धिमत्तेच्या व सर्वशास्त्रप्रवीणतेच्या अनेक कथा परिसरात सांगितल्या जातात. त्यांच्या प्रबोधनपर गद्यपद्यात्मक रचनांचा, ग्रंथांचा










व सर्वशास्त्रावगाही विवेचनपद्धतीचा विचार करता त्यांचे अलौकिक विभूतिमत्व प्रत्ययास येते.

तात्त्विक विषयांवरील त्यांचे विवेचन व प्रबोधन अकाट्य आहे. समताविचाराला पायाभूत ठरणाऱ्या त्यांच्या समन्वयशास्त्राच्या मांडणीला कुर्निसात करावा लागतो. मात्र मधुराभक्तीचा त्यांचा आविर्भाव जनसामान्यांच्या दृष्टीने समकालीन आधुनिक जाणिवांच्या विपरीत जातो. फुलेवादी–विवेकानंदवादी समाजसुधारणा/परिवर्तनाला त्यांनी दिलेला काटशहदेखील सर्वसामान्यांना विश्वसार्हतेला तडा देणारा वाटतो.

**श्री गणपती महाराज -**

श्री गणपती महाराज काचणूरकर (सन १८८७) म्हणजे जनकल्याणाची कृतिशील मूर्ती. त्यांचे बालपण पितृवियोगानंतर हालअपेष्टांत गेले. घोराड (विदर्भ) चे श्री संत केजाजी महाराज ही त्यांची श्रद्धेय संतमूर्ती होय. संत केजाजींना ते तुकोबांचा अवतार मानीत. त्यांची कर्मभूमी अमरावती जिल्ह्यातील मंगरूळ दस्तगीर. संपूर्ण भारतभर भ्रमंती केल्यानंतर गणपती महाराजांनी कीर्तन-प्रवचनांच्या माध्यमातून लोकजागृती केली. सामान्य जनसमाजाच्या उद्धाराकरिता कटिबद्ध होऊन जातिवर्ण तथा स्त्रीपुरुष भेदभावना झुगारून सर्वांच्या गुणविकासा-साठी त्यांनी आत्मीयतेने यत्न आरंभला. त्यांचे 'हरिगीता' (सन १९२२), 'अभंगवाणी' हे ग्रंथ प्रसिद्ध असून सन १९३० पासून त्यांच्या स्त्रीपुरुष शिष्यांनी शुभ्र ध्वज घेऊन प्रभातफेरी काढण्याची परिपाठी चालविली. 'उंचनीच नाही या जगात। सर्वांचा तो तात। परमात्मा।।' या भूमिकेवर आरूढ होऊन मिश्रविवाह, अजातततेची घोषणा, अस्पृश्यांना मंदिरप्रवेश अशा कितीतरी सुधारणा त्यांनी निर्भयपणे केल्या; पण पुराणमतवाद्यांनी व स्वार्थसाधूंनी अपप्रचार करून त्यांना वाळीतच काय, होळीतिही टाकण्याचा प्रयत्न केला. मात्र त्यांच्या संतवृत्तीमुळे असे सारे अपप्रयत्न निष्फळ ठरले. कीर्तन-प्रवचन तथा साहित्यनिर्मितीतून त्यांनी जनसामान्यांना समाजसुधारणेचे पुरोगामी धडे देऊन एक निर्भय, तत्त्वनिष्ठ लोकसंघटन उभारले.

**श्री नानाजी महाराज —**

श्री नानाजी महाराज दिघे सुरगावकर (सन १८८८) हे वैदर्भीय गांधी मानले जातात. त्यांनी घरोघरी भक्तिमार्ग प्रचारिला, एकभुक्त राहून सेवा केली. कृष्णमंदिर बांधवून लोकांना नित्य उपासना शिकवली. राधास्वामी पंथाचा अभ्यास व शिक्षकी व्यवसाय करून पुढे त्यांनी भारतभ्रमण केले आणि आप्तस्वकीयांच्या मृत्यूनंतर वाई–रामटेक--ताडोबा वनात तपस्या व दु:खी दलितांची सेवा केली. सुरगाव येथे ज्ञानेश्वरी आणि योगासन वर्ग चालवून त्यांनी सर्वांना साक्षर करून गावाचा कायापालट केला. त्यांच्या भूमिकेचे वैशिष्ट्य हे, की ग्रामोद्योग शिक्षणासाठी त्यांनी वर्ग चालविले व गावोगावच्या विद्यार्थ्यांना आर्थिक दृष्ट्या आत्मनिर्भर करण्याचा प्रयत्न केला. 'भक्तिसुधा' नावाचा त्यांचा रचनासंग्रह प्रसिद्ध आहे. मराठी–हिंदी भाषेतील त्यांच्या पदरचना प्रासादिक असून त्यांव्यतिरिक्त महाराजांचे अभंग, श्लोक, आरत्या आणि छंदही विपुल आहेत. मात्र त्या साऱ्यांची बैठक आध्यात्मिक, पारमार्थिक व भक्तिपर स्वरूपाचीच आहे.

यांच्याव्यतिरिक्त रेवशाचे संतकवी श्री श्यामरावबापू वाकोडे ('अभंगमाला'), माहुरचे संतकवी श्री विष्णुदास महाराज (गीते, आरतीसंग्रह), (अमरावतीचे कविभूषण बळवंत खापर्डे ('सर्वस्वाची गद्य गाणी' – काव्यसंग्रह), श्री खांडेकर उर्फ अंबाडेकर महाराज ('श्रीगुरुकृपामृत'), अंबाड्याचे श्री मोतीराम महाराज ('अभंगमाला'), वऱ्हाचे श्री दास महाराज (अभंगावली) अशा कितीतरी परमार्थप्रवण संतकवींचे लेखन व संकीर्तन गेल्या सव्वाशे वर्षात विदर्भभूमीने अनुभवले आहे.

**वैराग्यमूर्ती संतश्री गाडगे महाराज —**

या साऱ्यांच्या पार्श्वभूमीवर स्वकर्तृत्वाच्या लोकोत्तर आगळेपणाने उमटून उठलेले अनघड संत व कीर्तनकार वैराग्यमूर्ती संतश्री गाडगे महाराज (सन १८०६) यांचा प्रभाव गेल्या सव्वाशे वर्षांत या विदर्भभूमीवर सर्वाधिक पडला आहे. 'कां रे फिरता रानोरानी। पुसा संताला जाऊनी' - अशा सहजसिद्ध आदेशात्मक रचनांनी महाराष्ट्रभर त्यांनी संतवाणीचा जागर चालविला. संत गाडगेबाबांनी एकही ग्रंथ न लिहिता लोकोपयोगी विधायक कार्य व आगळीवेगळी वास्तवलक्ष्यी कीर्तनशैली यांच्या माध्यमातून सर्व संतमहात्म्यांच्या शिकवणुकीचा अर्क वेड्याबागड्या अशिक्षित जनतेच्या गळी उतरविला. रोखठोक व्यवहारवादी अशा त्यांच्या परखड बोलांमागे

भारतीय संतांची ज्ञान आणि विवेकाची परंपरा उभी होती. स्वतः अशिक्षित असलेल्या श्रीसंत गाडगेबाबांनी महाराष्ट्रभर वाऱ्यासारखे परिभ्रमण करून भारतीय संत-परंपरेच्या तत्त्वांशी कुठलीही तडजोड न करता मेघवृष्टीने जनप्रबोधन केले आणि रोकडा माणूसधर्म पंढरीपासून प्रयागपर्यंत वाहता ठेवला. ग्रामीण-शहरी, सुशिक्षित-अशिक्षित, दलित-उच्चभ्रू, हातमजूर-विद्वज्जन साऱ्यांनाच या जनप्रबोधकाने सचैल सुस्नात केले.

तारुण्यातच जुलमी सावकारी पाश तोडून आणि नंतर प्रखर वैराग्यातून संसारपाशही लाथाडून त्यांनी परखड जनजीवनसमीक्षा करीत सतत देशभ्रमंती केली व ज्ञानवंतांकडून अवधान, धनिकांकडून धन, कारागिरांकडून कौशल्य, श्रमिकांकडून श्रम यांची विवेकशील गुंफण करून तीर्थोतीर्थी घाट व धर्मशाळा, शहरोशहरी हॉस्पिटल्स व रुग्णसुविधांची केन्द्रे उभारली; दरिद्रनारायणांना अन्नवस्त्रांचे ढीग उपलब्ध करून दिले; दलित, अनाथ, अंधअपंगांसाठी सदावर्ते घातली; अर्धशेकड्यावर शाळा, छात्रालये, वृद्धाश्रम निर्माण केले; महारोग्यांच्या सेवेत संत मेहेरबाबांना, दलितोद्धारात डॉ. आंबेडकरांना तर गोसेवा व अंधश्रद्धा निर्मूलन-प्राणिहत्या-विरोध यांत राष्ट्रसंत तुकडोजींना भरभरून साहाय्य दिले. सर्व श्रद्धाळू जनतेला ईश्वरभक्तीपासून मानवसेवेपर्यंत विकसित करून 'देवकीनंदन गोपाला'च्या परंपरादत्त गजरात दैवी गुणसंपदेचे अधिष्ठान देऊन जगाला रोकडा मानवधर्म शिकविला. भुकेल्यांना अन्न, तहानेल्यांना पाणी, उघड्या-नागड्यांना वस्त्र, बेघरांना आसरा, बेकारांना रोजगार, दुःखी व निराशांना हिम्मत, गरीब मुलामुलींना शिक्षण, गरीब तरुण-तरुणींचे लग्न, अंध-पंगू-रोगी यांना औषध आणि पशुपक्षी तथा मुक्या प्राण्यांना अभय हाच आजचा रोकडा धर्म असून हीच खरी देवपूजा आहे, अशी संत गाडगेमहाराजांची शिकवण डॉ. बाबासाहेब आंबेडकर, डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुख यांसारख्या क्रांतिपुत्रांनाही मोहवून गेली. २० व्या शतकाच्या पूर्वार्धात संत गाडगेमहाराजांच्या प्रबोधनाचा झंझावात संपूर्ण महाराष्ट्रात निनादत राहिला. गाडगेबाबांचा हा रोकडा मानवधर्म म्हणजे जनसेवेचा चढता सोपानच म्हणावा लागेल.

**राष्ट्रसंत तुकडोजी महाराज –**

अमरावतीजवळच्या यावली (शहीद) येथे भाटाच्या घरी अशिक्षित मातापित्यांच्या दरिद्री झोपडीत १९०९ मध्ये जन्मलेला माणिक पुढे तुकड्या-देवबाबा-तुकडेबुवा-तुकडोजी महाराज व अंततः राष्ट्रसंत तुकडोजी या नावाने प्रसिद्धी पावला. बिऱ्हाड पाठीवर घेतलेल्या मायबापांसोबत अस्थिर वातावरणात बालपण घालवलेल्या तुकडोजींच्या पदरी कसेबसे चार वर्गांचे शिक्षण पडले. वरखेड (ता. तिवसा) या आजोळी विदेही आडकोजी महाराजांना गुरू मानून व त्यांची सूचना मनी मुरवून त्यांच्या निर्वाणानंतर रामटेक-रामदिघी-ताडोबा-गोंदुडा वनात त्यांनी चिंतनसाधना केली. परंपरागत साधुवेष किंवा गाडगेबाबांप्रमाणे पिशाच्चवेष धारण न करताही साध्यासरळ परिवेशात त्यांनी परिसरातील जनमने आपल्या गीत-कवन-विचार-उच्चार आणि कृतिशील शुद्धाचरणाने जिंकून घेतली. त्यांच्या स्वतंत्र चिंतनाने महापंडितांनाही मुग्ध करून टाकले; तर काव्यरचना नि भजनगायनाने जनमनात क्रांती घडवून आणली. नामांकित संतमहंतच नव्हेत, तर देशाचे थोर राष्ट्रभक्तही त्यांच्या विचारांचा व कार्यशैलीचा आदर करू लागले. आदिवासी माना-पारधी-गोंडगोवारी यांपासून उच्चवर्णीयांपर्यंतचा संपूर्ण समाजच त्यांनी एकात्मभावाने जागविला. विदर्भातील स्वातंत्र्य चळवळीचे नेतृत्व केले. त्यापायी १०० दिवसांचा तुरुंगवासही भोगला. आपल्या सेवा-संघटनात्मक मानवधर्माने त्यांनी विदर्भातील गावन् गाव जागविला. नेपाळ, गोमंतक, ब्रह्मदेश, जपान या देशांत जाऊन आपल्या समन्वयक तत्त्वप्रणालीचा प्रभाव गाजविला. सामुदायिक ध्यान, प्रार्थना, रामधून, सर्वधर्मसमन्वय, संतसंमेलने आदी कार्यक्रमांद्वारे नवयुगाचा पाया घातला. हे नवयुग म्हणजे अध्यात्माधिष्ठित विज्ञाननिष्ठ विकासाचे युग होय. व्यायाम, आयुर्वेद, शिक्षण, पशुधनरक्षण, व्यसननिर्मूलन, बलिबंदी, ग्रामोद्योग आदी जीवनावश्यक विषयांवर आंदोलने घडवून आणली. यात्रा, मेळे, विवाह, सणोत्सव, संस्कार आदींचे परंपरागत स्वरूप बदलवून त्यांना जीवनविकासोन्मुख असे विवेकशील वळण दिले.

राष्ट्रसंत तुकडोजींची साहित्यनिर्मिती प्रायः प्रबोधनपर आहे. अविश्रान्त प्रवास व जाहीर भजनांच्या कार्यक्रमांतच

अनुक्रमणिका






त्यांनी शेकडो लेख, हजारो श्लोक-भजने-छंद आदी रचले आहेत. गीताप्रसाद, युगप्रभात, विश्वशांतियोग, समाज-संजीवनी, सुविचारस्मरणी, हितबोध, नवप्रकाश, नवजागृती, जीवनजागृती, जीवनज्योती, सुधासिंधू, भक्तिसुधा, ज्ञानकुंज, क्रांतिवीणा, क्रांतिदीप, विवेकसरिता, विवेकमाधुरी, दिव्यदर्शन, अनुभवप्रकाश, अनुभवप्रसाद, अनुभवसागर, गांधी गीतांजली, अनुभवामृत अभंगावली, स्वानंदामृत, आदेश रचना, राष्ट्रीय भजनावली, भारत साधु समाजकी सेवासाधना, स्फूर्तितरंग, मेरी जापानयात्रा, मेरी जीवनयात्रा, लहरकी बरखा, आनंदामृत, ग्रामगीता असे ७०-८० गद्य-पद्य ग्रंथ लिहून त्यांनी हे जनोद्धारक साहित्य जनतेच्या सुपूर्द केले.

**स्वामी सीतारामदास महाराज –**

त्यांच्याहून १०० वर्षांनी अधिक वय असलेले मंडला-रामटेकचे ज्येष्ठ राष्ट्रसंतप्रेमी योगीराज स्वामी श्री सीतारामदास महाराज यांचीदेखील 'हितोपदेशामृत', 'अष्टांगयोग', 'मन की कहानी मन को सुनाना' आदी पुस्तके प्रसिद्ध आहेत.

**दामोदर उर्फ 'सुदाम' सावरकर –**

राष्ट्रसंत तुकडोजी महाराजांचे अध्यात्मपूत व्यक्तित्व, प्रतिभापूत साहित्य व संघटनात्मक कार्यकर्तृत्व यांच्या प्रभावामुळे अनेक कार्यकर्ते सामाजिक दायित्वाच्या भावनेने त्यांच्याशी जुळले. भारतीय परिप्रेक्ष्यात सतत ३० वर्षेपर्यंत मेघवृष्टीने सुरू असलेले राष्ट्रसंतांचे प्रबोधन अनेक अशिक्षित–अर्धशिक्षित निम्नजातवर्गीय तरुणांच्या आयुष्याला सात्त्विक वळण देणारे ठरले. अनेक लेखक-कवी त्यातून उदयास येत गेले. त्यांपैकी सर्वाधिक प्रतिभाशाली म्हणजे संततुल्य व्यक्तिमत्त्व असणारे जनसारस्वत 'सुदाम' सावरकर होत.

वयाच्या १४ व्या वर्षी स्वतःच्या काव्यरचनांवर अभिप्राय घेण्याच्या निमित्ताने संत तुकडोजींच्या संपर्कात आलेले व त्यातूनच भक्तिभावाने तुकडोजी महाराजांना अनुसरलेले दामोदर उर्फ 'सुदाम' सावरकर (१९१६-१९९०) हे त्यांच्या धार्मिक-सांस्कृतिक चळवळीच्या गतिविधींशी निकटतेने जुळले; तुकडोजींचे सखेसांगाती बनले; त्यांच्या साहित्याचे संकलक-संपादक-परिष्कारक झाले. सुविचार स्मरणी, लहरकी बरखा, ग्रामगीता आदी महत्त्वाच्या सर्व ग्रंथांसकट राष्ट्रसंत तुकडोजींच्या २५ ग्रंथांचे ते संपादक राहिले. 'श्रीकृष्ण गीत' (१९३८) या भक्तिगीत संग्रहापासून थेट 'सौदामिनी' (२००३) या ललितमधुर गीतिकाव्यसंग्रहापर्यंतचा 'सुदाम' सावरकरांचा काव्योन्मेष प्रसिद्ध असून 'युगक्रांती' (१९४९) हे प्रबोधनपर संगीत नाटक तथा ४ नाटिका 'श्रीगुरुदेव' मासिकातून प्रसिद्ध झाल्या आहेत. 'नामदेव चरितामृत', 'वाल्मीकि गीतांजली', 'आडकुजी गौरवगाथा' यांसारख्या अनेक छोटेखानी रचना त्यांच्या नावे असल्या, तरी त्यांची खरी ओळख संतचरित्र संशोधनामुळेच महाराष्ट्राला झालेली आहे. 'संतश्रेष्ठ तुकाराम : वैकुण्ठगमन की खून?' (१९७९) या सत्यान्वेषी शोधग्रंथाने सांप्रदायिक वारकरी भक्तांमध्ये प्रचंड खळबळ माजली. 'तपोमूर्ती श्री गाडगेबाबा' (१९८१), 'आद्यसंत श्री सावता महाराज' (१९८०) आणि राष्ट्रसंत श्रीतुकडोजी महाराजांचे ११ खंडांमधील 'जीवनयोगी' (१९८२-१९८९) हे बृहद् चरित्र ही चरित्रसंशोधने तसेच 'जनसंस्कृतीचे आधारस्तंभ' (२००१), 'अष्टश्लोकी भागवत' (१९८८) ही विवेचनात्मक मौलिक पुस्तके - यांच्यामधून 'सुदाम' सावरकरांनी नव्या पिढ्यांचे उत्कृष्ट प्रबोधन साधले आहे. राष्ट्रसंतांच्या मौलिक चिंतनाच्या भक्कम आधारावर उभारलेले हे चिंतन म्हणजे आध्यात्मिक आणि ऐहिकाचे उत्कृष्ट संमीलन होय. डोळस श्रद्धा म्हणजे काय, अध्यात्म आणि विज्ञानविवेक परस्परांच्या हातात हात घालून जेव्हा जीवनतथ्यांवर प्रज्ञेचाझोत टाकतात, तेव्हा ज्ञानक्षेत्रांची कूटे कशी सहजगत्या उघडू-उलगडू लागतात, याचा वस्तुपाठच त्यांच्या या संशोधनात्मक विवेचनावरून मिळतो.

राष्ट्रसंतांच्या सत्संगप्रभावाने श्रीसंत अच्युत महाराज यांनी लिहिलेले बहुतांश ग्रंथ (महाभारत, भागवत, स्वानुभव भजनमाला, संतांचे जीवनदर्शन, तीर्थांचे माहात्म्य, सात्त्विक नाटके आदी) हे पारंपारिक जाणीव-संवेदनांचे बळ घेऊनच उभे असले, तरी त्यांना राष्ट्रसंतांच्या संजीवक चेतनेचा स्पर्श झालेला आहे. स्व. बाबा महाराज (मोरेश्वर जोशी) यांनी १२ वर्षे गुरूदेव सेवा मंडळाचा प्रचार करून पंढरपूरलगतच्या सिद्धेश्वर क्षेत्री मोक्षधाम निर्माण केले व ज्ञानेश्वरीवर 'दिव्यामृतधारा' हा विवेक-

ग्रंथ लिहिला. श्री रघुनाथराय पत्तरकिने (चरितामृत, प्रेमधारा, भक्तितरंग, डिव्हाइन डॉन) यांनीही ग्रंथ लिहून थेट कोकणापर्यंत राष्ट्रसंतविचारांचा प्रचार प्रभावीपणे केला. श्री महादेवऋषी घुसरकर (गुरूप्रसाद, जनसेवा भजनमाला) यांनी ग्रंथाद्वारे व कीर्तन-प्रवचनांद्वारे निरंतर राष्ट्रसंतविचाराचा प्रचार केला. श्री अतीतादास महाराज (स. वा. गांजरे) यांनी 'जीवन आदर्श भजनमाला' ग्रंथाबरोबरच प्रवचन-कीर्तनांद्वारे महत्त्वाचे कार्य केले.

श्रीमती विमलाबाई ठकार यांनी बंगाल ते आंध्र आणि राजस्थान येथील जनताच नव्हे, तर इंग्लंड, अमेरिकासुद्धा आपल्या बहुभाषी वक्तृत्वसिद्धीने जागविली. अध्यात्ममार्गीचे त्यांचे अनेक ग्रंथ प्रसिद्ध आहेत. वरखेडच्या स्व. वेणुताई बोके यांचा 'वेणुसुधा' हा गद्यपद्यसंग्रह प्रसिद्ध आहे.

**आचार्य विनोबा भावे –**

राष्ट्रसंतांच्याच काळात क्रियाशील असणारे विदर्भवासी संततुल्य व्यक्तिमत्त्व म्हणजे विनोबा भावे (१८९५). यांनी पारंपरिक अध्यात्मतत्त्व आणि महात्मा गांधीजींचा कृतिशील विचार यांच्या समन्वयातून नव्या कालसुसंगत आचारप्रणालीचा पुरस्कार केला; पण उच्चवर्णीय व मध्यमवर्गीय पांढरपेशांच्या तुलनेत निम्न समाजस्तरांपर्यंत त्यांचे प्रबोधन पोचू शकले नाही. आचार्य विनोबांनी वयाच्या पंचविशीपासून पुढील ३० वर्षे वर्धेजवळच्या सेवाग्राम–पवनार आश्रमांमध्ये कठोर रचनात्मक कार्यक्रमांत व्यतीत केली. १९४०-४२ मध्ये भारताच्या वतीने अहिंसा आंदोलनाचे वैयक्तिक सत्याग्रही म्हणून ते तुरुंगात गेले. १९५१ मध्ये त्यांनी मध्यप्रदेश, उत्तरप्रदेश, बिहार व राजस्थान येथे भूदान चळवळ चालविली. तिच्या व्यावहारिक अपयशामुळे १९५५ नंतर ग्रामदानाची कल्पना पुढे आणली, ज्याद्वारे 'एक गाव एक कुटुंब' कल्पना प्रत्यक्षात येईल, अशी अपेक्षा होती; पण तीदेखील अव्यवहार्य ठरली. १९५७ मध्ये केरळात शांतिसेना स्थापन केली; तर १९५८ मध्ये संपत्तिदान व संमतिदानाची कल्पना पुढे आणली. १९६० मध्ये चंबळ खोऱ्यातील डाकूंनी त्यांच्यासमक्ष आत्मसमर्पण केले. १९६६ पासून विनोबाजींनी 'सूक्ष्म कर्मयोगा'त प्रवेश केला आणि १९६८ मध्ये त्यांनी 'आचार्यकुला'ची स्थापना केली.

इतक्या बिनतोड कार्यव्यस्ततेतही त्यांनी धर्मविचार स्पष्ट करणारी २६-२७ पुस्तके लिहिली. 'उपनिषदांचा अभ्यास', 'गीता प्रवचने', 'स्थितप्रज्ञदर्शन', 'साम्यसूत्र', 'भागवत धर्मसार', 'गीताई चिंतनिका' इ. पुस्तके ही त्यांच्या निरूपणात्मक प्रतिभेची उत्कृष्ट विलसिते होत. विविध धर्मग्रंथांचे सार प्रकट करणारी व संतवाणीचे संकलन करणारी महत्त्वाची साहित्यसेवा विनोबांनी केली आहे. त्यांच्यातील मूलभूत चिंतनपद्धत ही समन्वयाची असून त्याद्वारे साम्ययोगाचे फलित त्यांना अपेक्षित दिसते. भगवद्गीतेमधील साम्ययोग त्यांनी ३ पुस्तकांमधून स्पष्ट केला आहे. वेदान्त आणि बौद्ध दर्शनांच्या समन्वयातूनच खरा जीवनविचार बाहेर येऊ शकेल, अशी त्यांची भूमिका दिसते. तसेच ज्ञान आणि विज्ञान यांच्या संयोगाद्वारे घडून येणारी शरीर व बुद्धीची तप:साधना हीच कालसुसंगत ठरेल, अशीही त्यांची युगबोधी धारणा दिसते.

मात्र या सर्वांमागचा त्यांचा उद्देश केवळ आध्यात्मिक उन्नतीचा आहे. मौन उपासना, स्नेहोपासना, नामस्मरण, गुणोपासना, व्रतोपासना, सामूहिक समाधी, सूक्ष्मतर कर्मात प्रवेश, क्षेत्रसंन्यास, कांचनमुक्ती, सत्तामुक्ती, अनुशासन पर्व अशा नवनव्या संज्ञासंकल्पना सर्जित करूनही आयुष्याच्या अंतिम पर्वात मात्र ते सनातन धर्मपरंपरेलाच अनुसरले व प्रारब्ध, नामस्मरण; अंतमती यांच्या आहारी जाऊन पूर्व आचार्यांचेच अनुसरण करीत प्रायोपवेशन करून मृत्यूला ते सामोरे गेले. परंपरेच्या अशा निर्णयक प्रभावापायी महात्मा गांधींच्या आधुनिक कल्पनांचे अनुसरण करण्याची प्रेरणा विनोबांचे प्रबोधनपर साहित्य देऊ शकले नाही. 'साम्ययोग' व 'अहिंसा' यांचे शास्त्र तर काय, प्रचार-विस्तारही प्रभावी रीत्या ते करू शकले नाहीत. त्यांच्या प्रबोधनपर साहित्यातून आर्थिक-सामाजिक वा विज्ञानक्षेत्रातील मूलभूत महत्त्वाची काहीएक दृष्टी प्राप्त होऊ शकली नाही. अगदी डाकूंचे समर्पण किंवा भूदानप्रयोगदेखील समाजक्रांतीची चेतना जागवू शकले नाहीत.

एकंदरीत, उच्चप्रतीची विद्वता व निरूपणक्षमता असूनही ऋषितुल्य विनोबा भावे यांच्या प्रबोधक साहित्याची जातकुळी अभिजन संस्कृतीशीच निगडित राहिल्यामुळे

महात्मा गांधी किंवा संत गाडगेबाबा किंवा राष्ट्रसंत तुकडोजी यांच्याप्रमाणे व्यापक जनसंस्कृतीशी त्यांची नाळ जुळू शकली नाही. जनसामान्यांच्या आकांक्षा आणि आचार्य विनोबांची विद्वता यांदरम्यान (प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांच्या बाबतीत राहिली तशीच) एक दुर्लंघ्य दरी आजतागायत बनून राहिली आहे.

त्या मानाने संततुल्य व्यक्तिमत्त्वाचे **डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुख** यांच्या कृतिशील प्रबोधनाचे आवाहन शेतकरी-शेतमजुरांपर्यंत जाऊन पोचले व तळा-गाळातल्या श्रमिक वर्गांना शिक्षण, कृषी व उद्योग यांमधून जीवनविकासाचे काही मार्गही खुले झाले. मात्र हे आवाहन व विकासाच्या या दिशा लौकिक व ऐहिक पातळीवरच रेंगाळत राहिल्या; आत्मशक्तीच्या विकासप्रेरणांच्या अभावी व्यावहारिकतेपलीकडे जाऊन त्या अधिक उन्नत होऊ शकल्या नाहीत.

संततुल्य व्यक्तिमत्त्वाच्या डॉ. शिवाजीराव उर्फ दाजीसाहेब पटवर्धनांनी भंगलेल्या मानवमूर्तींच्या पुनर्वसनाच्या केलेल्या प्रत्यक्ष कार्यामधून आध्यात्मिकतेशी निगडित समता-बंधुतेचा जो संदेश बाहेर आला, त्यातून प्रेरणा घेऊन इतरही काही संस्था-संघटना कार्यान्वित झाल्या आहेत, आणि मानवतेच्या व्यापक पायावर समाजमनाची उभारणी करण्याचे कार्य निरपेक्षपणे करू लागल्या आहेत.

लोकसंत गाडगेबाबा, महात्मा गांधी, राष्ट्रसंत तुकडोजी, डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुख व डॉ. दाजीसाहेब पटवर्धन यांच्या प्रेरणेतून स्व. बाबा आमटे (कुष्ठरोग्यांचे पुनर्वसन), श्रद्धेय स्व. तुकारामदादा गीताचार्य (आदर्श ग्रामनिर्माण व ग्राम प्रशासन), श्री. अण्णा हजारे (लोकशाही व्यवस्थेचे पुन:स्थापन), श्री. शंकरराव पापळकर (अनाथ बालकांचे पुनर्वसन), डॉ. भाऊ झिटे (निसर्गोपचार आरोग्यकेन्द्र संचालन), श्री. बाबाजी तोफा (ग्रामनवनिर्माण कार्यकर्ता), कन्नू मडावी (आदिवासी आरोग्य अनुसंधान), ॲड. डॉ. एकनाथ साळवे (आदिवासींचे न्यायनिष्ठ पुनर्वसन) यांचे प्रबोधन व प्रत्यक्ष कार्य विदर्भातच नव्हे तर देशपातळीवरही आजमितीस सुरू आहे. स्व. बाबा आमटे यांचे 'ज्वाला आणि फुले' व 'करुणेचा कलाम' हे काव्यसंग्रह प्रबोधनाचे पायिक होऊ शकले असते; परन्तु त्यांमागील प्रेरणा या युरोपीय वाङ्मयाच्या प्रभावाखाली गठित झालेल्या असल्यामुळे व सामूहिक अभ्युदयाऐवजी व्यक्तिकेंद्रित आदर्शांची जोपासना करणाऱ्या असल्यामुळे त्यांचे आवाहन हे उच्चभ्रू वर्गाला तसेच पांढरपेशा मध्यमवर्गाला तेवढे पोचले. प्रा. नरहर कुरुंदकर, पु. ल. देशपांडे, ना. ग. गोरे, यदुनाथ थत्ते, चंद्रशेखर धर्माधिकारी आदी विचारवंत व साहित्यिकांना बाबांच्या काव्याचे प्रबोधन बहुमोल वाटले असले, तरी व्यापक समाजातील निम्नस्तरीय जनतेला त्यापासून कृतिप्रेरणा प्राप्त झालेल्या दिसत नाहीत. त्यांच्या काव्याची निर्मितिप्रक्रियासुद्धा एकसंध नाही.

### (४) भारतीय संदर्भात वैदर्भीय संतांचे प्रबोधन

वैदर्भीय संतसारस्वतांपैकी मराठीचे आद्यकवी श्री मुकुंदराज यांच्या प्रबोधनाचे भाषामाध्यम मराठी व शैली प्रासादिक असली, तरी आशय प्राय: पारंपरिकच आहे. वेदोपनिषद आणि गोरक्षप्रणीत नाथसंप्रदाय या दोहोंचे बळ त्यांच्या रचनेत एकवटले आहे. तेच महानुभाव पंथप्रवर्तक सर्वज्ञ श्रीचक्रधर यांच्या निरूपणविवेचनात मात्र धर्मभाषेसकट सर्वच्या सर्व खुणा बंडखोरीच्या आहेत. या बंडखोरीमागे बहुदेवोपासना, कर्मकाण्ड, देहक्लेष, व्रतोपासना, स्त्रीपुरुषभेद, स्पृश्यास्पृश्यता या भेदमूलक गर्हणीय बाबी लक्ष्यस्थानी असून त्यामुळे उद्‌भवलेल्या अमानवी संकटग्रस्त अवस्थेतून अज्ञजनांना मुक्त करण्यासाठी त्यांच्या मनात करुणेचा सागर सदोदित उसळत होता. देवनाथ-दयाळनाथ या नाथशिष्यपरंपरेतील संतकवींच्या प्रबोधनपर काव्यात समतावादी समाजधारणेला बळ पुरविणाऱ्या बाबी-विशेषत: धर्म/जातविषमतानिषेध व कर्मकाण्डाला नकार- या उतरलेल्या दिसतात. वेदान्त आणि भूतदया यांचा समन्वय साधणाऱ्या धर्माचा- अर्थात मानवधर्माचाच आशय त्यांच्या काव्यातून अभिव्यक्त झालेला दिसून येतो. अवधूतपंथीयांच्या भजनपरंपरेने जनसामान्यांना तसेच आपद्‌ग्रस्तांना समता आणि न्यायाची शिकवण सातत्याने दिली असून भविष्यलक्ष्यी कूटरचनांद्वारा दलित-पददलितांमध्ये हिंमत जागविणारा आशावादही निर्माण केला आहे. जनांचे मानसिक संतुलन कायम राखून मानसिक आरोग्य

सांभाळण्याचे सामर्थ्य त्या रचनांमध्ये असल्याचा दृढविश्वास हे त्यांचे बळ होय; म्हणूनच भूतबाधा झालेले रुग्ण तेथे दुरुस्त होतात. झामसिंग महाराज, नसकरी महाराज, बालाजी महाराज ह्या अनुक्रमे साक्षात्कारी संत, संतचरित्रकार व प्रबोधनकारांनी भारतीय नेणिवेतील सामूहिक शहाणपणाचाच उद्घोष परंपरागत शैलीत केलेला असून आध्यात्मिक समता-स्वातंत्र्याचाच बोध त्यांच्या रचना तथा कार्यांमधून झालेला दिसतो. त्या तुलनेत काचणूरकर श्रीगणपती महाराज यांचे कीर्तन-प्रवचन-अभंगादी काव्यलेखन यांतून आलेले प्रबोधन हे क्रांतिकारी आशय व शैलीचे म्हणावे लागते. ही क्रांती त्यांना पारमार्थिकाबरोबरच लौकिकातही अपेक्षित असून जाति-धर्म तथा स्त्री-पुरुषसमता आग्रहपूर्वक रुजविताना त्यांनी कितीतरी गुणवत्तापूर्ण सुधारणा अगदी जिवाची पर्वाही न करता निर्भपणे घडवून आणल्या. त्यासाठी त्यांनी तत्त्वनिष्ठ लोकसंघटनही उभे केले व सज्जनांच्या त्या मांदियाळीद्वारे जातिविहीन समाजाचे स्वप्न प्रत्यक्षात आणण्याचा प्रामाणिक प्रयत्नही केला.

मात्र विदर्भातील संतमंडळात विशेष तेजाने चमकून उठले ते प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज माधानकर, लोकसंत गाडगेबाबा आणि राष्ट्रसंत तुकडोजी महाराज. या त्रिमूर्तींमध्ये दोघे प्रज्ञा-प्रतिभावंत कवी होते; तर गाडगेबाबा हे परखड ग्रामीण गद्यकाव्य शैलीचे प्रतिभाशाली कीर्तनकार! त्यांच्या कीर्तनात नामदेव, कबीर,तुकाराम, रैदास आणि मध्ययुगीन संतांच्या अभंगांची हजेरी हटकून लागत असे. (संतचरित्रकार जनसारस्वत 'सुदाम' सावरकरांनी तर त्यांना महाराष्ट्राचे आधुनिक तुकारामच म्हटले आहे.) मात्र या तिघा प्रतिभावंत संतांच्या प्रबोधनाचा विचार करताना त्यांच्यादरम्यानचे अंतर्गत नातेही स्पष्ट होत जाते.

२० व्या शतकात प्रारंभापासूनच लोकसंत गाडगे महाराज आणि अंधसंत गुलाबराव महाराज या दोन वैदर्भीय विभूतींनी स्वतःच्या व्यक्तित्व आणि कर्तृत्वाद्वारे मानवी जीवनाचे अनुक्रमे **अटळ वास्तव** आणि **श्रेयस स्वप्न** हे दोन धृव समृद्ध करण्यासाठी आयुष्य वेचले. निरक्षर व अंध असलेल्या गुलाबराव महाराजांची एकंदर ५ भाषांमध्ये २१०० अभंग, २२५० पदे, १२५० गीते, १००० श्लोक आणि २३०० ओव्या (एकूण ६००० पृष्ठे) एवढी काव्यरचना असून भक्ती, तत्त्वज्ञान, विज्ञान, आयुर्वेद, संगीत, काव्य, व्याकरण या साहित्यप्रकारां-बरोबरच नाटक, चरित्र, आत्मचरित्र, प्रवासवर्णन, निबंध आदी नवे साहित्यप्रकारही आहेत. या सर्वांमधून घडणारे अत्युच्च प्रतिभाविलासाचे दर्शन थक्क करणारे-, केवळ स्वप्नवत आहे. सांप्रदायिक मर्यादांमध्ये का असेना, हे भारतीय जीवनश्रेयाचे अत्यंत विलोभनीय असे दर्शन होय. त्यातील सांप्रदायिक मर्यादाही वर्णव्यवस्था, पारंपरिक नीतिकल्पना आणि वैदिक हिंदुत्वनिष्ठ जीवनरीती यांच्या असून, या मर्यादा उल्लंघून व्यापक मानव्यविचारांच्या क्षितिजावर झेप घेतलेल्या म. फुले, स्वामी विवेकानंद आदी क्रांतिकारकांच्या नव्या युगाच्या विचारांचे त्यांनी निर्भयपणे खंडनच केले आहे. त्यामुळे त्यांचे साहित्य हे कालवास्तवापासून दूर– एका स्वप्नभूमीचे दर्शन घडविते. या स्वप्नभूमीत नवविधा भक्तीतील माधुर्यभक्ती, अद्वैत विचारातील मायावाद/ चिद्विलासवाद, पंथ-संप्रदाय समन्वय या महत्त्वाच्या योगदानाचा समावेश होतो. त्यांपैकी मार्गसमन्वय, धर्ममतांचा समन्वय, जातिवर्ण समन्वय यांतून सामाजिक बंधुत्वभावाला लाभणारे भक्कम तात्त्विक अधिष्ठान हे तेवढे आधुनिक मानव्यविचाराशी सुसंगत - म्हणून वस्तुनिष्ठ लौकिक/ऐहिक जीवनात महत्त्वपूर्ण ठरते. त्यातूनच पुढे (१) व्यापक मानवता विचार (२) संस्कार व नीतिप्रभाव शिक्षणासाठी शास्त्रीय मार्गांचा पुरस्कार व (३) विभक्ततेमध्ये अखंडत्व पाहणारी 'भारतीय' समन्वयदृष्टी - या आजच्या काळाशी सुसंगत असलेल्या महत्त्वाच्या बाबी उपपन्न होतात. संत गुलाबराव महाराजांच्या साहित्यातून घडणाऱ्या प्रबोधनाची जातकुळी ही अशी वेदान्तप्रभव भारतीयता उजागर करणारी आहे.

याउलट, संत गाडगेबाबांची प्रकृती एका जहाल रॅशनॅलिस्ट सुधारक संतांची असून पुरोहितशाहीने निर्मिलेल्या भाकड कल्पनांचे जंजाळ भेदून श्रद्धेचे शुद्ध रूप, मानवी कर्तृत्वाचे निरामय क्षितिज आणि समाजजीवन धारणेचे निकोप मानवी तत्त्व त्यांनी समाजाला दिले. त्यांनी देवाची अवलाद असलेल्या माणसाला साध्या शुचिर्भूत मनाने, सुसंस्कारित विज्ञाननिष्ठ विवेकबुद्धीने व प्रगल्भ आत्मसन्मानाने जगण्याची लाखमोलाची शिकवण दिली.








लोकांच्या पवित्र धर्मश्रद्धेला धक्का न लावता तिला विज्ञाननिष्ठ वळण लावून अंततः प्रत्यक्ष सत्कार्यात लावण्याचा आग्रह त्यांनी सतत धरला. पुस्तकी तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रे आणि लौकिक-पारलौकिक विचारव्यूह झुगारून देऊन व्यवहारविश्व समृद्ध करण्याची शिकवण ते देत राहिले. कीर्तनासारख्या जनआवाहनसुलभ माध्यमामुळे व लोकभाषा-लोकशैलीच्या आस्थापूर्ण घटकांमुळे ती शिकवण जनसामान्यांच्या, गोरगरिबांच्या घराघरांत पोचली.

वरील सर्व बाबी विचारात घेता, गाडगेबाबांच्या प्रबोधनाचे हे प्रातिनिधिक **लौकिकत्व** आणि गुलाबराव महाराजांच्या साहित्यातून प्राप्त होणाऱ्या प्रबोधनाचे अपवादभूत **अलौकिकत्व** म्हणजे भारतीय संततत्त्वज्ञांच्या प्रबोधनाचे दोन ध्रुवच म्हणावे लागतील. पार्थिव/अपार्थिव, अभ्युदय/निःश्रेयस, व्यवहार/अध्यात्म या दोन ध्रुवांच्या दरम्यान संपूर्ण भारतीय प्रबोधन विकसित झाले आहे. भारतीय पातळीवर वैदिक ऋषी, औपनिषदिक राजर्षी, आद्य शंकराचार्य, गुरू गोरक्षनाथ, आद्यकवी मुकुंदराज, संत ज्ञानदेव, संत एकनाथ आणि संत रामदास यांच्या परंपरेशी वैदर्भीय संतश्री गुलाबराव महाराजांच्या प्रबोधनाची जातकुळी मिळतीजुळती असल्याचे जाणवते; तर लोकायतिक तत्त्वचिंतक, तथागत गौतम बुद्ध, संपूर्ण नाथपरंपरा, श्रीचक्रपाणी-गोविंदप्रभू, संत नामदेव प्रभावळ, संत कबीर, संत रैदास, संत तुकाराम आणि महात्मा फुले-बाबासाहेब आंबेडकर यांच्या परंपरेशी लोकसंत गाडगेबाबांच्या प्रबोधनाची जातकुळी जुळते.

मात्र पार्थिव-अपार्थिवाच्या या दोन्ही ध्रुवांचा समन्वय आपल्याला राष्ट्रसंत तुकडोजी महाराजांच्या व्यक्तित्वात, कार्यात तसेच प्रबोधनातही दिसून येतो. संत गुलाबराव महाराजांचे अध्यात्मतत्त्व आणि संत गाडगे महाराजांचा प्रत्यक्ष जीवनव्यवहार यांची युगानुकूल सांगड घालून जनमानसात नवा युगविचार पेरण्याचे व तो युगविचार भजन-कीर्तनादी लोकमाध्यमांद्वारे तसेच कृतिशील संघटनाद्वारे रुजविण्याचे कार्य राष्ट्रसंत तुकडोजींनी गेल्या शतकातील चवथ्या ते सातव्या दशकांदरम्यान करून दाखविले. राष्ट्रसंतांच्या या समन्वयक प्रबोधनात राज्यप्रशासन, समाजशास्त्र, ग्रामीण अर्थशास्त्र, शिक्षणशास्त्र, पर्यावरणशास्त्र, साहित्य व कलास्वरूप शास्त्र आदी आधुनिक शास्त्रांचे संचित पचवून त्या प्रत्येक क्षेत्राला योग्य दिशा देण्याची व त्यायोगे जीवनव्यवहार समृद्ध करण्याची क्षमता आहे. लोकमानसात आत्मोद्धाराची आकांक्षा जागवून व आत्मवान जनांची संघटना बांधून त्यांच्याद्वारे समाजजीवनाचा अभ्युदय साधण्याचे धोरण त्यांच्या प्रबोधक साहित्यामागे आहे. त्यामुळेच ग्रामप्रशासनात ग्रामकुटुंब ते ग्रामस्वराज्य हा मार्ग ते प्रशस्त करू शकले; शिक्षणात शारीर-मानस-आत्मिक गरजांची परिपूर्ती करीत जीवनशिक्षण ते मूल्यशिक्षण हा सोपान ते दाखवू शकले; समाजजीवनात अध्यात्म आणि विज्ञान यांचा समन्वय साधून रूढ संस्कारांमध्ये क्रांतिकारी परिवर्तन घडवून आणू शकले; ग्रामाला समाजार्थिक एकक घोषित करून ग्रामप्रशासना सोबतच समाजार्थिक समता-न्याय-बंधुतेचा एकात्मिक ध्वज उभारू शकले; पर्यावरण संतुलन तथा समृद्धीतच मानवजीवनाचा विकास असल्याची दृष्टी अनुसरत श्रम व सेवेच्या माध्यमातून ग्रामीण भारताच्या जीवनप्रक्रियांचे व्यवस्थापन विज्ञाननिष्ठ (लोकायतिक) मार्गांनी साधू शकले; तथागत गौतम बुद्धाच्या मध्यममार्गालाच केवळ नव्हे, तर त्यांच्या क्रांतिकारी भिक्षुसंघामागील प्रेरणेलाही अनुसरत जनजीवनकलेचा परिपोष साधण्यासाठी सेवाधर्मी प्रचारकांची संघटनाही उभारू शकले; गोरक्षनाथांप्रमाणे सर्वसंचारी वृत्तीतून देशस्थितीचा सखोल आढावा घेऊन संत नामदेवांप्रमाणे भारतभर गुरुदेवप्रणीत सेवाधर्माचा प्रचार प्रबोधक साहित्याद्वारे घडवून आणू शकले; संत कबीरांप्रमाणे समता-बंधुतेचा झंझावात भजन-संकीर्तनाद्वारे परखड शब्दांत निर्माण करू शकले; संत एकनाथांप्रमाणे बहुविध साहित्यरूपांची बूज राखीत बहुरंगी-बहुढंगी अशा संत तुकारामांप्रमाणे आत्मपर काव्यारचनांमधूनही जन-प्रबोधनाची विश्वव्यापी तार छेडत राहू शकले; इतकेच काय पण महात्मा फुले, स्वामी विवेकानंद, लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, बाबासाहेब आंबेडकर या आधुनिक युगद्रष्ट्या महामानवांच्या बहुविध विचारप्रणालींचाही समन्वय साधीत श्रीगुरूदेव तत्त्वचिंतनात एकात्म कल्पदृष्टीसह त्यांचा मुक्तकंठाने जयघोष करू शकले.

एकंदरीत, प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांची भक्ती








व काव्यशक्ती आणि लोकसंत गाडगेबाबांचे वैराग्य आणि निरपेक्ष सेवावृत्ती यांचा उत्तम समन्वय राष्ट्रसंत तुकडोजींच्या कार्यातून व प्रबोधनात्मक साहित्यातून झाला असल्याचे दिसून येते. लोकसंत गाडगेबाबा व राष्ट्रसंत तुकडोजी महाराज यांच्या प्रबोधनाचा लोकमानसावरील प्रभाव गेले अर्धशतक टिकून राहिला असल्यामुळेच राज्यकर्त्यांनादेखील ग्रामस्वच्छता, ग्रामआरोग्य, शिक्षण, ग्राम प्रशासन व एकंदरीतच आदर्श ग्राम निर्माणासंदर्भात त्यांच्या कार्याची दखल आज घ्यावी लागत आहे.



---

# गीतारहस्याची पूर्वपीठिका

प्रा. श्री. मा. भावे

'राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठा'ने आपल्या लोकमान्य बाळ गंगाधर टिळक स्मृती व्याख्यानमालेत व्याख्यान देण्यासाठी मला बोलावून माझा जो सन्मान केला, त्यासाठी विद्यापीठाचा व या मालेच्या संयोजकांचा मी फार आभारी आहे. नागपुरात 'गीतारहस्या'-विषयी बोलण्यात एक विशेष औचित्य आहे. ते असे की, गीतेवरचे आपले स्वतंत्र विचार व्यक्त करणारे पहिले भाषण लोकमान्यांनी १९०२ साली नागपुरात दिले. या व्याख्यानमालेच्या प्रतिष्ठेला शोभेल आणि येथे जमलेल्या जाणकार श्रोतृसमाजाला पसंत पडेल असे माझे व्याख्यान व्हावे, अशी माझी प्रार्थना आहे.

माझ्या व्याख्यानाचे चार भाग आहेत. प्रास्ताविकात मी 'पूर्वपीठिका' या शब्दाने मला काय अभिप्रेत आहे ते सांगेन. नंतर इंग्रजी राजवटीत हिंदू धर्म, समाज व हिंदूंचे वैयक्तिक आचरण यावर जे निंद्य आरोप इंग्रजी विद्वानांकडून करण्यात आले, त्यांचा आढावा असेल. तिसऱ्या भागात ज्याला लोकमान्य टिळक 'आधिभौतिक सुखवाद' असे नाव देतात, त्या तत्त्वज्ञानाचा व त्यातून निष्पन्न होणाऱ्या नीतिशास्त्राचा परिचय करून घेऊ. चौथ्या भागात गीतेतील अध्यात्मापासून प्राप्त होणारी नीतितत्त्वे आधिभौतिक सुखवादातील नीतिशास्त्रापेक्षा कोणत्या दृष्टीने अधिक मूलगामी आहेत हे सांगू. शेवटी थोडक्यात उपसंहार करून व्याख्यान संपेल.

## (१)

गीतारहस्याच्या पूर्वी टिळकांनी 'दी ओरायन' व 'दी आर्क्टिक होम इन द वेदाज्' हे दोन्ही ग्रंथ इंग्रजीत लिहिले होते. 'श्रीमद्‌भगवद्‌गीतारहस्य अथवा कर्मयोगशास्त्र' हा आपला अपूर्व ग्रंथ मात्र त्यांनी मराठीत लिहिला व महाराष्ट्र शारदेला एक अदभुत महावस्त्र अर्पण केले. शतकाशतकांतून एखादाच असा अजोड ग्रंथ निर्माण होत असतो. या ग्रंथाचा नीतिशास्त्राच्या अंगाने विचार केला, तर त्यात दोन स्रोत आपल्याला दिसून येतात.

सांख्य, योग, मीमांसा, वेदान्त, महाभारत, मनुस्मृती, वेगवेगळ्या गीता यांतून उपलब्ध होणाऱ्या हिंदू परंपरेतील संचिताचे दीर्घकाळ मंथन करून लोकमान्यांनी आपल्या प्रतिभेने काढलेले नवनीत या ग्रंथाच्या रूपाने मराठी समाजासमोर ठेवले, हे स्पष्टच आहे. भारतीय अध्यात्म व त्याच्या आधारावर उभे राहिलेले नीतिशास्त्र हा या थोर ग्रंथाचा एक स्रोत आहे.

गीतारहस्यात विचारांचा दुसराही तितकाच महत्त्वाचा प्रवाह आहे. त्याचा आढळ लोकमान्यांनी प्रस्तुत ग्रंथाला 'द हिंदु फिलॉसॉफी ऑफ लाइफ, एथिक्स ॲन्ड रिलिजन' हे इंग्रजी उपशीर्षक दिले आहे, त्यात होतो. स्वदेश, स्वभाषा व स्वधर्म यांचा सशक्त अभिमान बाळगणाऱ्या ग्रंथकाराने हे इंग्रजी उपशीर्षक कशासाठी दिले, असा प्रश्न सहजच येतो. प्रस्तावनेत याचा अप्रत्यक्ष खुलासा मिळतो तो असा– "ज्या युक्तीने कर्मे केली म्हणजे कोणतेच पाप न लागता अखेर त्यानेच मोक्षही मिळतो, त्या युक्तीने म्हणजेच ज्ञानमूलक व भक्तिप्रधान कर्मयोगाचेच गीतेत प्रतिपादन आहे, असा आमचा अभिप्राय आहे. कर्माकर्माच्या किंवा धर्माधर्माच्या विवेचनासच आधुनिक केवळ आधिभौतिक पंडित नीतिशास्त्र असे म्हणतात." (प्रस्तावना पान ११). 'ज्ञानमूलक' या विशेषणाने जीवनाचे तत्त्वज्ञान म्हणजेच 'फिलॉसॉफी ऑफ लाइफ'; 'भक्तिप्रधान' या शब्दाने उपासनेची रीत म्हणजेच 'रिलिजन'; 'कर्मयोग' या संज्ञेने नीतिशास्त्र किंवा 'एथिक्स' हे टिळकांना अभिप्रेत आहे. यातून इंग्रजी उपशीर्षकाचा उलगडा होतो.

प्रस्तावनेत टिळक पुढे सांगतात, "आधिभौतिक ज्ञानाची अर्वाचीन पाश्चिमात्य देशात जी वाढ झाली आहे, त्यामुळे अध्यात्मशास्त्राला धरून केलेली प्राचीन विवेचने हल्लीच्या काळास पूर्णपणे लागू पडणे शक्य नाही, अशी कित्येक नव्या विद्वानांची समजूत झालेली

असते. हे समज खरे नव्हेत असे दाखविण्यात गीतारहस्यातील विवेचनात गीतेच्या सिद्धान्ताच्या जोडीने पाश्चात्त्य पंडितांचे सिद्धान्त आम्ही जागोजागी संक्षेपाने दिले आहेत. ...अर्वाचीन काळी झालेल्या आधिभौतिक शास्त्रांच्या अपूर्व वाढीने ज्यांची दृष्टी दिपून गेली आहे, किंवा सध्याच्या एकदेशीय शिक्षण-पद्धतीमुळे नीतिशास्त्राचा आधिभौतिक म्हणजे बाह्यदृष्टीने विचार करण्यास जे शिकले आहेत, त्यांस या तुलनेवरून एवढे स्पष्ट कळून येईल की, मोक्षधर्म व नीती हे दोन्ही विचार आधिभौतिक ज्ञानाच्या पलीकडचे असल्याने प्राचीन काळी आमच्या शास्त्रकारांनी या बाबतीत जे सिद्धान्त केले, त्यांच्यापुढे ज्ञानाची गती अद्याप गेलेली नाही." (प्रस्तावना पान १२-१३). यावरून हे स्पष्ट होते की, गीतारहस्य एका बाजूने पारंपरिक विचारांना धरून विवेचन करते, तर दुसऱ्या बाजूने आधुनिक मराठी विचारकांशी संवाद साधण्याचा हेतू बाळगते. अध्यात्म व नीती यांचा संबंध नाही किंबहुना अध्यात्म ही केवळ फोल कल्पना आहे, अशी आंग्लशिक्षित विद्वानांची धारणा होती. त्यांना उद्देशून हे इंग्रजी उपशीर्षक टिळकांनी दिलेले आहे.

आधुनिक समाजातील नागरिकांची कर्तव्ये पार पाडणे प्रत्येकाच्या दृष्टीने गरजेचे आहे, हे मिल (१८०६-१८७३) व स्पेन्सर (१८२०-१९०३) यांनी ऐहिक सुखवाद व उत्क्रांतिवाद यांच्या आधाराने स्पष्ट केले होते. भारतीय अध्यात्माच्या साहाय्यानेही ऐहिक व्यवहाराविषयीचे तेच नियम निष्पन्न होतात; इतकेच नव्हे तर अध्यात्मात कर्त्याच्या हेतूला जे महत्त्व दिले आहे, त्यामुळे नीतीला धरून मनुष्याने का वागावे, याचे समाधानकारक उत्तर मिळते, असा विचार टिळकांच्या मनात अनेक वर्षे वावरत होता. स्पेन्सरवरचा जो मृत्युलेख टिळकांनी डिसेंबर १९०३ मध्ये लिहिला, त्यात या विचाराचे उद्‌घाटन त्यांनी केले होते. ते लिहितात, 'अगदी रानटी स्थितीपासून सुधारता सुधारता उत्क्रांतितत्त्वाने हल्लीचा समाज कसा बनला याचेही त्यांनी (पक्षी: स्पेन्सर) एक स्वतंत्र शास्त्र बनविले आहे; व प्रत्येक मनुष्याचे, समाजाचे, राजाचे व प्रजेचे कर्तव्य काय आणि त्याच्या अभिवृद्धीची दिशा कोणती. ...या बाबतीत शास्त्रीय ग्रंथ लिहून त्यांनी. ...एक प्रकारचा कायमचा मार्ग दाखविला आहे. ... वेदान्तातील किंवा सांख्यांचे तत्त्वज्ञान अशा रीतीने व्यवहारोपयोगी करण्याचा आमच्या मते पूर्वी कधीच प्रयत्न झाला नव्हता. नाही म्हणावयास 'भगवद्‌गीता' हाच काय तो अपवाद आहे.' (लो. टिळकांचे केसरीवरील लेख, भाग ४था, पान ३६६-६७). 'गीतारहस्या'मागे ही भूमिका किंवा पीठिका आहे.

(२)

१९व्या शतकाच्या सुरुवातीला हिंदुस्थानातील फार मोठ्या भूप्रदेशावर ईस्ट इंडिया कंपनीचे राज्य पसरले. या आपल्या साम्राज्याचे समर्थन आणि उपयोग कसा करावा, याचा विचार इंग्लंडमधील मुत्सद्द्यांत सुरू झाला. याबाबत दोन मतप्रवाह होते. ख्रिस्ती धर्मगुरूंना वाटत होते, की धर्मप्रसारासाठी ही नवी संधी चालून आली आहे. याखेरीज युरोपातील प्रबोधन युगाचे, ज्याला एन्‌लाइटनमेंट म्हणतात, जे प्रतिनिधी होते त्यांना असे वाटत होते की, हिंदी समाजाला जगाच्या इतिहासाच्या मुख्य प्रवाहात आणण्याची ही संधी आहे. 'White Man's Burden' किंवा 'गोऱ्या माणसाची जबाबदारी' हा जो शब्दप्रयोग पुढे प्रचलित झाला, त्याची ही सुरुवात होती. काही असले तरी, दोन्ही गटांचे यावर एकमत होते, की हिंदू समाज हा अंधश्रद्धा, वेडगळ रूढी व रानटी धर्म यांच्या दलदलीत रुतला आहे. या स्थितीतून त्या समाजाला ओढून काढण्यासाठी धर्मांतराचा प्रयोग वापरायचा, की आधुनिक कायदेकानूंचे औषध द्यावयाचे, यावर मतभेद होते.

धर्मगुरूंचा प्रवक्ता विल्बरफोर्स (१७५९-१८३३) व नवविचारांचा पुरस्कर्ता जेम्स मिल (१७७३-१८३६) या दोघांनी हिंदू समाजावर, त्यांच्या नीतिमत्तेवर व प्रचलित रूढींवर अनन्वित टीका केली. विल्बरफोर्स ब्रिटिश संसदेत म्हणाला, "Upon the whole, we cannot help recognising in the people of Hindustan a race of men lamentably degenerate and base; retaining but a feeble sense of moral obligation; obstinate in the disregard of what they know to be right; governed by malevolent and licentious passions." जेम्स मिलने 'हिंदुस्थानचा इतिहास' लिहिला. हिंदी व चिनी

या दोन्ही समाजाविषयी तो लिहितो, "Both nations are to nearly an equal degree tanited with the voices & insincerity; dissembling, treacherous, mendacious to an excess which surpasses even the unusual measure of uncultivated society. ...Both are, in the physical sense disgustingly unclean in their persons and houses." याखेरीज आणखी किती तरी अपशब्दांची खैरात या दोघांनी हिंदू समाजावर केली होती.

या टीकेचा प्रभाव पडून कंपनीच्या सनदेचे १८१३ साली नूतनीकरण करताना ब्रिटिश संसदेने कंपनीवर दोन अटी घातल्या. प्रजेच्या शिक्षणावर कंपनीने दरवर्षी १ लाख रुपये खर्च करावेत; आणि ख्रिस्ती प्रचारकांना कंपनीच्या प्रदेशात धर्मप्रसाराला परवानगी द्यावी. यानंतर ख्रिस्ती मिशनऱ्यांनी ठिकठिकाणी आपले मठ उभारून शाळा काढल्या. कंपनीने कलकत्ता, बनारस व पुणे येथे भारतीय विद्यांचे संस्कृतमधून शिक्षण देणारी महाविद्यालये काढली व मुसलमानांना त्यांच्या परंपरागत विद्या शिकवण्यासाठी अरबी व फार्सी मदरसे थाटले.

१८व्या शतकाच्या उत्तरार्धात युरोपात जे प्रबोधनयुग आले त्यातील मुख्य तत्त्व असे होते- सृष्टीच्या निरीक्षणातून आपल्याला सृष्टीच्या व्यवहाराचे नियम कळतात. त्या नियमांचा उपयोग करून आपण निसर्गातील शक्तींचा उपयोग मनुष्याच्या सुखासाठी करून घेतो. त्याचप्रमाणे निरनिराळ्या समाजांचे निरीक्षण करून आपण समाजाच्या संघटनेची तत्त्वे जाणून घेऊ शकतो. या तत्त्वांना धरून जर आपण समाज-नियमनाचे कायदे केले व लोकांना त्या नियमांचे शिक्षण दिले, तर समाजातील मनुष्यबळाचा वापरही समाजाच्या उन्नतीसाठी करून घेता येतो.

वर ज्याचा उल्लेख येतो तो जेम्स मिल या विचाराचा पुरस्कर्ता होता. तसेच तो जेरेमी बेन्थॅम (१७४८-१८३२) या महापंडिताचा अनुयायी होता. 'उपयुक्ततावाद' हे तत्त्वज्ञान बेन्थॅमने प्रथम मांडले. हिंदुस्थानात नव्याने होणारे कायदे 'उपयुक्ततावादी' तत्त्वज्ञानाला धरून केले जावेत, असा जेम्स मिलचा आग्रह होता. इंग्लंडमध्ये हेली बेरी इथे ईस्ट इंडिया कंपनीने एक शिक्षण संस्था काढली होती. हिंदुस्थानात जे अधिकारी पाठवायचे, त्यांना या संस्थेत प्रशिक्षण दिले जाई. जेम्स मिल हा कंपनीत उच्चाधिकारी होता. हेली बेरीच्या संस्थेत त्याची व्याख्याने होत. त्यांत तो उपयुक्ततावादाचे विवेचन करी. मिलच्या मनात हिंदुसंस्कृतीविषयी जी तिरस्काराची भावना होती, ती भावना या अधिकाऱ्यांतही बिंबत असे. कंपनीच्या हिंदुस्थानातील प्रशासनात अशा प्रकारे उपयुक्ततावादाचा शिरकाव झाला.

हिंदुस्थानातील दिवाणी आणि फौजदारी कायद्यांच्या संहिता करण्यासाठी टी. बी. मेकॉले (१८००-१८५९) हा विद्वान मनुष्य हिंदुस्थानात पाठविण्यात आला. त्याने आजही प्रचलित असणारे दिवाणी आणि फौजदारी कायदे तयार केलेच; पण कंपनीचे हिंदुस्थानातील अधिकारी आणि इंग्लंडमधील संचालक मंडळ यांच्यातील वादाचाही निवाडा केला. तो वाद असा होता, की हिंदी प्रजेला त्यांचे पारंपरिक शिक्षण संस्कृत किंवा अरेबिक अशा भाषांतून द्यावे, की पाश्चात्त्य ज्ञान इंग्रजीतून शिकवावे? मेकॉलेलाही भारतीय संस्कृती आणि भारतीय विद्या यांच्याविषयी अतिशय तिटकारा होता. पौर्वात्य विद्यांच्या बाजूने जे अधिकारी बोलत, त्यांना 'ओरिएन्टॅलिस्ट्स' असे म्हणतात. मेकॉले लिहितो, "I am quite ready to take the oriental at the valuation of the orientalists themselves. I have never found any among them who could deny that a single shelf of good European Library was worth the whole native literature of India and Arabia" त्यामुळे यापूर्वी सुरू झालेली संस्कृत महाविद्यालये व मदरसे यांचे नवीन कॉलेजेसमध्ये रूपांतर करण्यात आले व पारंपरिक शिक्षण अडगळीत पडले.

जेम्स मिल, मेकॉले यांची पुस्तके शाळा-कॉलेजांतून क्रमिक पुस्तके म्हणून शिकविली जात. मिशनरी शाळांतून तर भारतीयच नव्हे तर सर्व पौर्वात्य धर्म, विद्या, चालीरीती यांची निंदा चालत असे. यामुळे इंग्रजी शिक्षण घेतलेल्या पहिल्या पिढीत स्वदेश, स्वधर्म आणि संस्कृती यांच्याविषयी तुच्छतेची मनोवृत्ती तयार झाली. या मनोवृत्तीचे उत्तम वर्णन विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी आपल्या 'इतिहास' या निबंधात केले आहे. "आमच्या लोकांत जर स्वत:विषयी

समजुती पाहिल्या तर अशा आहेत– 'अहो! आम्ही कसचे लोक हो! आम्ही का शूर आहोत, का विद्वान आहो, का सदाचारी आहो, का सद्धर्मी आहो? आमचे पूर्वज तरी कसले? त्यांनी ग्रीक व रोमन लोकांप्रमाणे राज्ये केली, का हल्लीच्या इंग्रजांप्रमाणे आगगाड्या काढल्या, तारायंत्रे रोविली, का कलाकौशल्य वाढविले? आमचा धर्म काय, आमची शास्त्रे काय, आमचे ज्ञान काय? सगळे येथून तेथून वेडगळपणाचे! या सर्वांचा जेव्हा समूळ उच्छेद होईल तेव्हा कोठे हिंदुस्थानास सुधारणुकेची कळा येऊ लागेल.' " (निबंधमाला, 'इतिहास')

(३)

'निबंधमाला'कारांनी वर्णिलेला हा न्यूनगंड आणखी पंधरावीस वर्षांनी बराच निवळला होता. मालाकारांच्या स्वाभिमानी विचारांचे अंजन सुशिक्षितांच्या डोळ्यांत झणझणून त्यांची दृष्टी स्वच्छ झाली होती. दुसरे असे, की खुद्द इंग्रज विद्वानांनीच आमचे प्राचीन व्याकरण, गणित, काव्यशास्त्र, खगोलशास्त्र यांचा अभ्यास करून प्राचीन आर्यांचे या विषयातील ज्ञान समकालीन युरोपियन चिंतनापेक्षा कितीतरी पुढे गेले होते अशी कबुली, नाराजीने का हाईना, दिली होती. तथापि, एक रुखरुख होतीच. ती अशी, की प्राचीन पंडितांनी नीती सांगणारी धर्मशास्त्रे रचिली होती, तरी नीतिशास्त्र मात्र रचले नव्हते. म्हणजे, काही मूलतत्त्वे घेऊन त्यापासून धर्मशास्त्रातील नीतिनियम कसे निष्पन्न होतात, हे सांगितले नव्हते.

याच सुमारास आपल्याकडील सुशिक्षित वर्गासमोर मिल आणि स्पेन्सर यांनी पूर्णपणे इहवादी मूलतत्त्वे गृहीत धरून रचलेले नीतिशास्त्र आले. मिल व स्पेन्सर यांची पुस्तके त्या काळच्या सुशिक्षितांत केवढी प्रिय झाली होती, याची आज कल्पनाही येणार नाही. त्या पुस्तकांची मराठी भाषांतरे पुण्याच्या दाभोळकर यांनी प्रसिद्ध केली होती. केवळ आपल्याकडेच नव्हे, तर जगभर मिल आणि स्पेन्सर यांची ख्याती पसरली होती. मिलच्या विचारांना पूरक असेच स्पेन्सरचे लिखाण असल्याने दोन्हींचा एकत्रच विचार करू.

सुशिक्षितांना भावलेली गोष्ट म्हणजे या नीतिशास्त्राने कोणत्याच बाबतीत पारलौकिकाचा आधार घेतला नव्हता. किंबहुना आत्मा, देव-देवता इत्यादी पारलौकिक कल्पना म्हणजे रानटी समाजातील वेडगळ समजुतींनाच दिलेले सफाईदार रूप आहे, असे स्पेन्सरने दाखवून दिले होते. तो लिहितो, 'प्रथम रानट्यास वाटू लागते, की.... प्रत्येक वस्तूचा एक दुय्यम आहे, द्वित्वाची कल्पना, ती त्याला पडणारी जी स्वप्ने त्यावरून दृढ होते; कारण स्वप्नामध्ये तो. ...(ज्या) गोष्टी पाहतो (त्यांचा) जागृतीमध्ये त्याला काहीच अनुभव येत नाही; म्हणून त्यास वाटते की, आपलाही एक दुय्यम असून तो झोपेमध्ये हा सर्व व्यवहार करतो. ...नंतर मरण हीही एक बेशुद्धीच आहे. ...त्या वेळीही माणसाचा दुय्यम त्याच्यातून निघून गेलेला असतो, व तो केव्हातरी परत येईल असे त्याला वाटू लागते. प्रथम हा दुय्यम मूळ माणसासारखाच हाडामांसाचा असेल, असे (आदि माणसास) वाटून मृतमाणूस आपला आप्त असेल तर त्याच्या खाण्यापिण्याची वगैरे तरतूद तो करू लागतो. ...अशा रीतीने प्रेतपूजा एकदा निर्माण झाली, की तिजपासून पुढे सर्व प्रकारच्या पूजांची उत्पत्ती होते, आणि त्यापासून एकंदर देवतापूजेची व अतएव एकदेव पूजेची उत्पत्ती होत असते.' (समाजशास्त्राची मूलतत्त्वे. रूपांतरकार ना. ल. फडके)

पारलौकिकाचा आधार याप्रमाणे काढून घेतल्यावर मनुष्याच्या इच्छाआकांक्षांचा विचार करूनच नीतीची मांडणी करावी लागते. प्रत्येक मनुष्याला आपल्या सुखाची वृद्धी व्हावी आणि दुःखापासून सुटका व्हावी, अशी इच्छा असते व मनुष्यसमाजालाही तेच हवे असते. मनुष्याच्या ज्या कृतीमुळे सुखात वाढ होईल व दुःखाचा निरास होईल ती कृती चांगली आणि त्याविरुद्ध परिणाम देणारी कृती वाईट, हे सहजच ठरते. समाज जी कृती करतो, ती विधिमंडळाने केलेल्या कायद्याच्या रूपाने अनुभवास येते. ज्याच्यामुळे समाजातील पुष्कळ लोकांना पुष्कळ संतोष होईल, तो कायदा चांगला व ज्यामुळे असंतोष वाटेल तो कायदा वाईट, हे उघडच आहे. किंबहुना, या आधिभौतिक सुखवादाचा जनक जो बेन्थॅम, त्याने ही विचारसरणी कायदेमंडळांना मार्गदर्शन करण्यासाठीच रचली होती.

या विचारसरणीवर पुष्कळच आक्षेप घेता येण्याजोगे होतील उदा., एखाद्या वर्तनामुळे काही सुख व काही

दुःख निर्माण होत असेल, तर त्या कृतीची नैतिकता ठरविण्यासाठी आपल्याला त्या कृतीपासून निर्माण झालेल्या सुखाची राशी व दुःखाची राशी यांची तुलना करावी लागेल. ही सुखदुःखाची मोजदाद कशी करायची? सुख देणारी वस्तू व सुखाचा भोग घेणारा कर्ता यांच्यापासून सुख वेगळे करून त्याची किंमत कशी ठरवायची? एखादा कायदा करताना सरधोपट विचार करून त्या कायद्यापासून समाजाला समाधान होईल की असंतोष माजेल, याचा अंदाज कदाचित करता येईलही; पण कृती करण्यापूर्वी तिची इष्टानिष्टता त्या कृतीच्या कर्त्याला कशी समजेल?

या बाबतीतील अधिक मूलगामी तार्किक अडचण स्वतः मिलनेच नमूद केली आहे. तिला 'तो सुखवादातील व्याघात' असे म्हणतो. त्या व्याघाताचे स्वरूप असे-व्यक्ती स्वसुखासाठी धडपडते हे सुखवादाचे गृहीतक आहे. परंतु, समाजाची सध्याची अपूर्ण अवस्था व विषमता पाहता काही व्यक्तींनी स्वतःच्या सुखाचे समर्पण केल्याखेरीज समाजाच्या एकूण सुखात वाढ होणे शक्य नाही. त्यामुळे समाजाच्या सुखासाठी स्वसुखाचा त्याग करण्याची तयारी हा एक सामाजिक सद्गुण म्हणावा लागेल. परंतु, हा सद्गुण सुखावादाचे जे मूळ गृहीतक की, माणसाला स्वतःच्या सुखाचा उत्कर्ष साधावयाचा असतो, त्याच्या विरोधात जातो. त्यावर मिलचा युक्तिवाद असा, की मनुष्याला आपल्या समाजाशी मिसळून राहण्याची इच्छा असते, हे सुखवादी नीतीचे पायाभूत तत्त्व आहे. इथे आपण दुसऱ्या एका पेचात अडकतो. 'सुखवर्धन व दुःखविमोचन' हे व्यक्तीचे परमसाध्य आहे, या गृहीतकाने आपण सुरुवात केली आणि अशा निर्णयाप्रत आलो, की 'समाजाशी एकरूप होऊन राहण्याची इच्छा' हे अधिक मूलभूत गृहीतक आहे.

सुखवादाला पारलौकिकाचा आधार नाही. त्याप्रमाणे कृतीची नैतिकता ही कृतीच्या परिणामावरून ठरते, हा सुखवादाचा आग्रह होता. कृती करण्यामागील प्रेरणेचा नैतिकतेशी काही संबंध नाही. मिल सांगतो, की "कृतीमागील प्रेरणेचा कृतीच्या नीतिमत्तेशी काही संबंध नाही. ...समजा, अ ने ब ला बुडताना वाचवले, तर ती कृती नीतीला धरून आहे. मग ब ला वाचवण्यामागे अ चा उद्देश कर्तव्य पार पाडावे असा असेल किंवा ब ला वाचविल्याने आपणास बक्षीस मिळावे, असाही असेल." या आग्रहावरून येणारा एक निष्कर्ष असा, की कृती करण्यापूर्वी आपली कृती नैतिक आहे की नाही, याची खात्री होऊ शकत नाही. आपल्या कृतीचा नक्की परिणाम काय होईल, हे कोण सांगू शकेल?

सुखवादातील या दोन्ही उणिवांची भरपाई करण्याचा प्रयत्न स्पेन्सर याने उत्क्रांतितत्त्वाचा आधार घेऊन केला. उत्क्रांतीच्या कल्पनेवर स्पेन्सरचा फार भरवसा होता. डार्विनच्या आधी ही कल्पना स्पेन्सरने मांडली होती व डार्विननेही ही गोष्ट मान्य केली होती. डार्विनने उत्क्रांतीची कल्पना जीवशास्त्राला लावून दाखविली व आदिम एकपेशी प्राण्यापासून आधुनिक मनुष्यप्राण्यापर्यंत जीवांचा विकास होत गेला, हा सिद्धान्त प्रस्थापित केला. स्पेन्सरने हीच कल्पना समाजशास्त्र, नीतिशास्त्र यांच्या उलगड्या-साठीदेखील वापरली.

उत्क्रांतीच्या अंगाने विचार केला, तर स्वसुखाचा उत्कर्ष घडवून आणणे ही व्यक्तीची आस असते, हे म्हणणे आदिम माणसाच्या बाबतीत खरे नाही. आदिम मनुष्याचीच काय पण सर्व प्राणिमात्राची मूळ प्रेरणा स्वतःचे व स्वतःच्या अपत्यांचे संरक्षण व संगोपन करावे, ही असते. मनुष्य जसा उत्क्रांत होत गेला, तसतसा ह्या प्रेरणांचाही विकास होत गेला. स्वतःचे संरक्षण व संगोपन या प्रेरणेचे रूपांतर स्वतःच्या सुखाचा उत्कर्ष साधण्यात झाले, तर अपत्यांविषयीची ममता हिचे परोपकाराच्या कल्पनेत रूपांतर झाले. उत्क्रांतीच्या सध्याच्या टप्प्यात मनुष्याच्या ठिकाणी सुखवर्धन व परोपकार या दोन आकांक्षा नांदत आहेत.

सध्या जगात दैन्य मोठ्या प्रमाणावर आहे. जे तुलनेने बऱ्या स्थितीत आहेत व ज्यांच्या ठिकाणी परोपकाराची प्रबळ ऊर्मी आहे, त्यांनी जर दारिद्र्यात खितपत असणाऱ्या बांधवांना मदत करण्याचे ठरवले, तर त्यांना स्वसुखाचे मोठ्या हिश्श्याने समर्पण करावे लागेल. सुखवादातील व्याघात जो दिसतो, तो या अपरिपूर्ण अवस्थेमुळे. जेव्हा आपण उत्क्रांतीचे पुढचे टप्पे पार करू, तेव्हा विषमता कमी झालेली असेल व सुस्थितीतील व्यक्तींना कराव्या लागणाऱ्या त्यागाचेही प्रमाण कमी

झालेले असेल. उपकाराच्या भावनेचा विकास होऊन तिची जागा आत्मीयतेच्या भावनेने घेतलेली असेल. आपण इतरांविषयी जितकी आत्मीयता दाखवू, तितक्या प्रमाणात आपण इतरांच्या सुखात आपला वाटा पाहू लागतो. इतरांनी स्वतःसाठी केलेल्या धडपडीतून त्यांना ज्या संतोषाचा लाभ होतो, त्यात आत्मीयतेच्या माध्यमातून आपण हिस्सेदार होतो. साहजिकच स्वसुखाच्या त्यागातून समाजाच्या सुखाची वाढ होते आहे, ही भावना जाऊन समाजाच्या वाढत्या सुखातून आपल्या सुखात भर पडते आहे, असा अनुभव येऊ लागतो. उत्क्रांतीच्या उलगडण्यातून सुखवादातील व्याघात आपोआपच नाहीसा होतो. (डेटा ऑफ एथिक्स, पान २५५).

मनुष्याच्या कृतीला आपण 'चांगली' किंवा 'वाईट' ही विशेषणे लावतो. पण सर्वच कृती चांगल्या-वाईटाच्या वर्गवारीत बसवता येतात, असे नाही. काही कृती आपाततः घडत असतात. त्या नीतिविचाराच्या परिघाच्या बाहेर असतात. अशा कृती वगळल्या तर आपण उरलेल्या कृतींवर 'चांगली' किंवा 'वाईट' शिक्के कसे मारतो? आज मनुष्य परिपूर्ण अवस्थेत नाही व मनुष्यांचा समाजही त्या अवस्थेला पोचलेला नाही. तरीही अशा काही कृती आहेत, ज्यांना आपण 'निरपवाद चांगली कृती' असे म्हणू शकतो. अशा कृतीचे उदाहरण म्हणून 'आईने बाळाला पाजणे' याचा उल्लेख स्पेन्सर करतो. आई बाळाला पाजते, तेव्हा आई व बाळ दोघांनाही सुख लाभते व दुःख कोणालाच होत नाही. म्हणून ही निरपवाद चांगली कृती होय. पण अशा कृती थोड्या. बहुतेक प्रत्येक कृतीपासून काही समाधान व काही असमाधान निर्माण होतेच. त्यामुळे ज्या कृतीने कमीतकमी असमाधान निर्माण होईल, म्हणजे जी कमीतकमी वाईट असेल, अशी कृती कर्त्याने केली पाहिजे व कृती करण्यापूर्वी ती कमीतकमी वाईट कृती आहे, याची खात्री कर्त्याला पटली पाहिजे.

ज्या अर्थी मनुष्य व त्याचा समाज यांच्या अपरिपूर्ण अवस्थेतही आपणास काही कृतींविषयी असे सांगता येते, की त्या कृती निरपवाद चांगल्या आहेत, त्या अर्थी उत्क्रांतीच्या मार्गावरील सध्याच्या टप्प्यात असतानाही आपण परिपूर्ण व्यक्ती व परिपूर्ण समाज यांची कल्पना करू शकतो. (डेटा ऑफ एथिक्स, पान २७८). अशा या आदर्श अवस्थेचे कल्पनाचित्र जर व्यक्तीच्या मनात सतत नांदत असेल, तर तिचा प्रत्येक व्यवहार समाजाची व व्यक्तीची अपरिपूर्णता ध्यानात घेऊनही आदर्शाकडे जाणारा राहील. कृती करण्यापूर्वीच कर्ता त्या कृतीची आदर्शाशी तुलना करून कृतीचे परिणाम कमीतकमी वाईट राहतील, याची काळजी घेईल.

लो. टिळकांनी सुखवादावरील आपले विचार संपविताना म्हटले आहे की, "सृष्टीची उत्तरोत्तर चढती पायरी लक्षात आणिली, की दुसरा असाही प्रश्न निघतो, की परोपकार बुद्धी या एकाच सद्गुणाचा मनुष्यात उत्कर्ष झाला आहे किंवा त्याबरोबरच. ...दुसऱ्या अनेक सात्त्विक सद्गुणांचीही वाढ झाली आहे. ...या सात्त्विक गुणांच्या समुच्चयास आपण 'माणुसकी' असे नाव देऊ. ...सर्व मनुष्यांचे 'मनुष्यपण' किंवा 'माणुसकी' ज्या कर्माने वाढेल किंवा त्या माणुसकीस जे शोभेल तेच सत्कृत्य किंवा तोच नीतिधर्म असे आता म्हटले पाहिजे." (गीतारहस्य, पान ५६).

सुखवादाच्या निरूपणाची सुरुवात आपण कृतीच्या अनुभवगम्य परिणामापासून केली. ज्या कृतीपासून सुखाची राशी वाढण्यास मदत होईल, ती कृती चांगली असे आपण ठरविले. तथापि, हे निरूपण करता करता आपण अशा मुक्कामावर येऊन पोचलो, की तिथे कृतीची नैतिकता ठरविण्यासाठी आपल्याला पारलौकिकाचा जरी नाही, तरी अव्यक्ताचा आधार घ्यावा लागला. आपल्याला अशा व्यक्तींची व समाजाची कल्पना करावी लागली, की ज्या परिपूर्ण आहेत व ज्या समाजात व्यक्तीव्यक्तींतील व्यवहार परिपूर्ण आहेत. या परिपूर्ण स्थितीला व्यक्ती व समाज उत्क्रांतीच्या किती पायऱ्या चढल्यावर पोचतील किंवा कधी पोचतील की नाही, हे सांगता येत नसले, तरी ती स्थिती आपण एक आदर्श किंवा प्रमाणस्थिती मानून आपले सध्याच्या अपरिपूर्ण अवस्थेतील व्यवहार त्या आदर्श स्थितीतील व्यवहाराशी कल्पनेने ताडून पाहू शकतो.

तथापि, कृतीच्या नैतिकतेची ही अनुभवपूर्व कसोटीही भारतीय नीतिविचाराच्या कसोटीला उतरत नाही; कारण या कसोटीतदेखील कर्त्याच्या बुद्धीचा म्हणजे त्याने केलेल्या

कृतीमागील प्रेरणेचा विचार केला जात नाही. कृतीमागील प्रेरणेचा विचार नैतिकता ठरविताना केला पाहिजे, हा आग्रह केवळ भारतीय परंपरेतच आहे असे नाही. सर्वच संस्कृतींनी व आधुनिक कायद्यातही हे तत्त्व मान्य केले आहे. "हत्या करणे हे कर्म एकच; पण आपल्या अंगावर चालून आलेल्यास स्वसंरक्षणार्थ मारणे व एखाद्या श्रीमंत वाटसरूचा द्रव्यासाठी वाटेत खून करणे, या गोष्टी नैतिक दृष्ट्या अत्यंत भिन्न आहेत." (गीतारहस्य, पान २८९).

सारांश, कृतीची नैतिकता ठरविताना कर्त्याचा हेतू हा निर्णायक महत्त्वाचा ठरतो. या हेतूसच उद्देश, वासना किंवा बुद्धी असे म्हणतात; आणि बुद्धीचे विवरण सुरू झाले की, आपण अध्यात्माच्या प्रांतात शिरतो.

(४)

आता आपण कृतीच्या नैतिकतेची गीतेने ठरविलेली कसोटी कोणती ते पाहणार आहोत. ते पाहण्यापूर्वी एका अडचणीचा थोडा विस्तारपूर्वक विचार केला पाहिजे. गीतेची रचना सुमारे दोन हजार वर्षांपूर्वी झाली. त्या वेळची सामाजिक स्थिती व 'सांस्कृतिक बंध' यांचे प्रतिबिंब गीतेतील विवेचनात साहजिकच पडले आहे. त्या वेळचा समाज हा चार वर्णांत विभागलेला होता. प्रत्येक वर्णातील व्यक्तीचे कार्य व समाजातील स्थान नेमून दिलेले होते. वर्तनक्रमावरचे नियमन धर्मशास्त्राने घालून दिलेले होते. यज्ञसंस्था व तिच्याशी संबंधित कर्मकांड यांचा मोठा प्रभाव समाजाच्या जीवनावर होता. व्यक्तीची नित्य व नैमित्तिक कर्मे परंपरेने ठरवून दिली होती. पुनर्जन्म, पापपुण्य, स्वर्गनरक इत्यादी सांस्कृतिक बंधांच्या चौकटीतून विचार मांडण्याचा प्रघात होता. सृष्टिरचना व सृष्टिसंहार यांचा विचार सांख्यांच्या पुरुष-प्रकृती या द्वैतापासून सुरू झाला होता आणि गीतेने या दोन्हीच्या पलीकडल्या पुरुषोत्तमाची कल्पना केली होती. हे सामाजिक व वैचारिक संदर्भ गीतेत जागोजागी येतात व यांतील बरेच संस्कृतिबंध आता कालबाह्य झाल्यामुळे सध्याच्या सुशिक्षितांनाही गीता वाचताना वारंवार अडखळल्यासारखे होते. 'गीतारहस्या'त खुद्द लोकमान्यांनीही या अडचणींचा उल्लेख केला आहे. त्यामुळे गीतेतील नीतिविचार मांडताना हे सांस्कृतिक बंध जमतील तेवढे बाजूला ठेवून व शक्यतो 'गीतारहस्या'तील उताऱ्यांचा आधार घेत मी पुढे जाणार आहे.

गीतेची सुरुवातच एका नैतिक समस्येपासून झाली आहे. अर्जुन क्षत्रिय होता. आयुष्यात तो अनेक युद्धे लढला होता. मनुष्यसंहार ही त्याला अपरिचित गोष्ट नव्हती. पण आपले आदरणीय गुरू, जवळचे नातेवाईक यांच्याशी आपण स्वार्थासाठी लढावे आणि त्यांची हत्या करावी इथपर्यंत आपले क्षत्रिय म्हणून असणारे कर्तव्य ताणावे का, हा पहिला प्रश्न होता. याच प्रश्नाची पुढची पायरी म्हणजे, जर क्षत्रिय म्हणून स्वजनांची हत्या करणेही प्राप्तच होत असेल, तर मी क्षत्रियत्वाचा त्याग करू शकतो की नाही? दोन्ही प्रश्न एकमेकात गुंतलेले असले, तरी आपण त्यांना निराळे करून पाहू शकतो. यांपैकी पहिल्या प्रश्नाचे उत्तर कृष्णाने 'शुद्ध बुद्धी'चा आधार देऊन केले आहे, तर दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर क्षत्रियत्व त्यागण्याचा तुझा निर्णय तुझ्या व्यक्तिमत्त्वाच्या कोणत्या स्तरावरून तू घेत आहेस, याची परीक्षा तू आधी कर असे बजावून दिले आहे. ही उत्तरे इतक्या स्वच्छ शब्दांत गीतारहस्यात आलेली नाहीत; पण साररूपाने ती अशीच आहेत, असे म्हणता येईल.

युद्धाला सुरुवात करताना अर्जुनाला सर्वांत जास्त संकोच भीष्म–द्रोणांशी युद्ध करण्याचा वाटत होता. हा संकोच दूर करण्यासाठी कृष्ण सांगतो, की "तुझ्या युद्ध करण्याने भीष्म मरणार की द्रोण मरणार, हा विचार गौण आहे. तू कोणत्या बुद्धीने युद्ध करण्यास उभा राहिला आहेस, हा मुख्य प्रश्न होय. ...भीष्माला मारण्याची फलाशा धरून तुम्ही युद्ध करीत नाही. ...तुम्हास जन्मतःच हक्काने प्राप्त झालेल्या राज्याचा विभाग तुम्ही मागितला. ...शिष्टाईच्या व साधुपणाच्या मार्गाने जेव्हा निभाव लागेना, तेव्हा नाइलाजास्तव तुम्ही युद्धास प्रवृत्त झाला, यात तुमचा काही दोष नाही. ...क्षात्रधर्माप्रमाणे लोकसंग्रहार्थ सदर हक्क युद्धाने संपादन करणे हे तुमचे कर्तव्य होय." (गीतारहस्य, पान २८९-९०). कृष्णाने ज्या युक्तिवादाने अर्जुनाचे समाधान केले आहे, ते हे उत्तर टिळकांनी नुसत्या गीतेवरून नव्हे तर महाभारतातील इतर उल्लेखांवरून सिद्ध केले आहे. यात तीन महत्त्वाच्या संकल्पना आल्या आहेत; त्या म्हणजे बुद्धी, फलाशा व

लोकसंग्रह या होत.

आपण फलाशेपासून सुरुवात करू. आपण पाहिले की, सुखवादात कृतीची नैतिकता ठरविण्यासाठी कृतीचा परिणाम म्हणजेच फल याला निर्णायक महत्त्व आहे. आपण हेही पाहिले की, कृती अमलात येण्यापूर्वी त्या कृतीचा अमुक एक परिणामच घडून येईल, याची खात्री देता येत नाही. कृतीची नैतिकता कृती घडण्यापूर्वी समजून आली पाहिजे. याचसाठी भारतीय नीतिशास्त्रज्ञांनी कृतीमागच्या कर्त्याच्या हेतूला अधिक महत्त्व दिले आहे. हा हेतू जास्तीत जास्त शुद्ध केव्हा होईल, तर कर्त्याने आपल्या कृतीच्या फलाचे ठायी असलेली ममत्वयुक्त आसक्ती सोडली पाहिजे. या ममत्वयुक्त आसक्तीलाच फलाशा असे म्हणतात. (गीतारहस्य, पान ६७-६८). ही फलाशा सोडणे म्हणजे कृतीचे फल मिळाले असता ते सोडणे किंवा ते फल कधीही कोणास न मिळावे अशी वासना धरणे, असे नव्हे. एखादी कृती करण्याची वेळ आपल्यावर येते तिथपासून कृती घडेपर्यंत खालील पायऱ्या आपणास दिसतात–

१) कृती करण्याची इच्छा किंवा निकड निर्माण होणे.

२) त्या कृतीचा काहीतरी परिणाम घडेल, याचे ज्ञान होणे.

३) अमक्या फलासाठी अमुक कृती ही योजना करणे.

४) त्याप्रमाणे हालचाल करणे.

या गोष्टी केल्याच पाहिजेत; त्यातून कर्त्याला दु:ख होत नाही, असे गीता सांगते.

आता कोणी म्हणेल की, जर विशिष्ट फल निर्माण व्हावे म्हणून कृती करावयाची पण त्या फलावर अधिकार सांगायचा नाही, तर कृती करताना हेळसांड होणारच. त्यावर गीता सांगते, की फळ मिळावे हा आग्रह किंवा वृथा आसक्ती न ठेवली तरी प्राप्त झालेले कर्म केवळ कर्तव्य म्हणून करण्याची बुद्धी व उत्साह सदर आग्रहाबरोबर मनातून नाहीशी झाली पाहिजेत, असे नाही. (गीतारहस्य, पान १९८). इथे हा प्रश्न येतो की, फळ मिळावे हा आग्रह तरी का सोडावा? त्याचे उत्तर गीतारहस्यकारांनी असे दिले आहे– कर्त्याच्या बुद्धीच्या ठिकाणी असलेल्या ममत्वयुक्त आग्रहाने मन ग्रासले असता, ईप्सित मिळण्यात अडथळा आल्यास दोन गोष्टी होण्याचा संभव असतो. 'अडथळा अनिवार्य व दैवकृत असल्यास नुसती निराशा होते आणि मनुष्यकृत असल्यास पुढे क्रोध किंवा द्वेषही उत्पन्न होऊन त्या द्वेषाने कुकर्म घडते व कुकर्माने नाश होतो.' (गीतारहस्य, पान ६८).

सुखवादाच्या विवेचनाच्या अखेरीस आपण पाहिले की, प्राणिमात्रांच्या ठिकाणी असलेली अपत्यसंगोपनाची उपजत ओढ उत्क्रांतीच्या ओघात मनुष्याच्या ठिकाणी उपकारबुद्धीत परिणत झाली. भविष्यात या उपकारबुद्धीचे उन्नयन आत्मीयतेत होईल व व्यक्ती इतरांच्या सुखात आपले सुख पाहील. गीतेचे प्रतिपादन असे आहे, की 'आत्मीयता' ही संकल्पना अध्यात्माच्या साहाय्याने अधिक खात्रीलायक पद्धतीने सांगता येते. गीतेने सांगितलेल्या अध्यात्माशी आपला थोडाबहुत परिचय असतोच, म्हणून इथे त्याचे थोडक्यात विवरण करतो.

अध्यात्मशास्त्र असे मानते, की सृष्टीतील पदार्थांचा इंद्रियास प्रत्यक्ष दिसणारा पण रोज पालटणारा अतएव, अनित्य, नामरूपात्मक देखावा आणि त्या नामरूपांनी आच्छादिलेले पण नित्य असे परमात्मतत्त्व अशी दोन नित्यानित्यरूपी मूलतत्त्वे होत. (गीतारहस्य, पान १५८). मनुष्याचा आत्मा हा त्या परमात्मतत्त्वाचा अंश असून तो नामरूपात्मक देहेंद्रियांनी आच्छादिलेला आहे. ही देहेंद्रियादिक नामरूपे विनाशी आहेत. यांतून सुटून अमृतत्व कसे संपादन होईल, अशी ओढ मनुष्याला असते. आत्म्यावर जे हे आच्छादन आहे, त्याला अनेक पदर आहेत. सर्वांत बाहेरचा पदर हा देहाचा, ज्यात पाच ज्ञानेंद्रिये आणि पाच कर्मेंद्रिये यांचा समावेश होतो. त्याच्या आतील पांघरूण हे मनाचे. ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये यांची कार्ये होण्यास मनाची जोड लागते. त्याच्या आत अहंकाराचे आच्छादन असते. अनित्य अशा नामरूपात्मक देखाव्यात मनुष्याचे निराळेपण त्याच्या अहंकारातून उत्पन्न होते. अहंकाराच्या आतले व आत्म्याला गुंडाळलेले वेष्टन म्हणजे बुद्धीचे होय. (गीतारहस्य, पान १०५ व १०८).

मनुष्य हा अशा रीतीने परमात्म्याचा अंश असलेला आत्मा व त्याच्यावर असलेले नामरूपात्मक सृष्टीचे किंवा प्रकृतीचे पांघरूण यांचा बनलेला असतो. 'कर्मात्मक

नामरूपाच्या विनाशी चक्रातून सुटून त्याच्या बुडाशी जे अमृत व अविनाशी (म्हणजेच परमात्म) तत्त्व आहे, त्याला जाऊन मिळण्याची मनुष्याची स्वाभाविक इच्छा असते.' (गीतारहस्य, पान १६७). 'जडदेह व इंद्रिये यांच्यात परमात्म्याचा अंशभूत जीव कोंडला गेला म्हणजे या कोंडीतून त्याची सुटका करून देणारी कर्मे करण्यास देहेंद्रियांची प्रवृत्ती होऊ लागते व यासच व्यावहारिक दृष्ट्या 'आत्म्याची स्वतंत्र प्रवृत्ती' असे म्हणतात.' (गीतारहस्य, पान १६९). आत्मा हा मुळात जरी आकर्ता आहे तरी कोंडीच्या निमित्तामुळे तो तितक्यापुरता दर्शनी प्रेरक बनतो. (तेथेच). आत्म्याची ही प्रेरणा व बाह्यसृष्टीतील पदार्थांच्या संयोगाने इंद्रियांच्या ठायी निर्माण होणारी प्रेरणा या वेगवेगळ्या होत.

हे अध्यात्म मान्य केले तर आपल्याला हे कळून येते, की व्यक्तीचा आत्मा व जीवमात्रांच्या ठिकाणी असणारे आत्मे हे एकाच तत्त्वाचे अंश आहेत व त्यामुळे त्यांच्यात स्वाभाविकच आत्मीयता नांदू शकते. मनुष्यामनुष्यांत संघर्ष होतो, तो मन–अहंकार–बुद्धी यांच्या कोंडीत सापडलेला आत्मा स्वतःप्रेरणेने वागू शकत नाही म्हणून होतो. स्पेन्सरने जी आत्मीयतेची (तिला तो 'सिंपथी' किंवा 'सहानुभूती' म्हणतो) संकल्पना मांडली, तिला या अध्यात्माचा भक्कम आधार मिळतो.

आपण पाहिले, की कृतीच्या परिणामावरून कृतीची नैतिकता ठरविणे धोक्याचे असते. कृतीची नैतिकता ज्या प्रेरणेतून कृती उत्पन्न झाली त्या प्रेरणेवरून ठरविली पाहिजे. पण बाह्यसृष्टीतील पदार्थांच्या संयोगाने इंद्रियांना मिळणारी प्रेरणा ही अशुद्ध असण्याचा संभव जास्त आहे. उलट आत्म्याकडून इंद्रियांना (म्हणजेच बुद्धी, अहंकार व मन) प्रेरणा मिळाल्यास ती कृती खात्रीने नीतिपूतच असणार. म्हणून शुद्ध व फलाशारहित प्रेरणा ही कृतीच्या नैतिकतेची हमी देते.

युद्ध करण्याची कृती फलाशा सोडून व शुद्ध बुद्धीने होत असेल, तर नीतीला धरूनच असणार, याचे इथपर्यंत विवेचन झाले; पण प्रश्न असा येतो की, युद्ध हे नीतीला धरून असले तरी मला ते करावे लागत आहे, ते क्षत्रियत्वामुळे. हे क्षत्रियत्व मी सोडू शकतो की नाही, या प्रश्नाचे उत्तर देताना गीतेने 'लोकसंग्रहा'ची संकल्पना पुढे आणली आहे. 'गीतारहस्या'त म्हटले आहे– 'अज्ञानाने सैरावैरा होऊन वागत असणाऱ्या लोकांस एकत्र संबद्ध करून त्यांच्या परस्परानुकूल्याने जे सामर्थ्य प्राप्त होते, ते त्यांच्या अंगी येईल अशा रीतीने त्यांचे पालन, पोषण व नियमन करणे' (गीतारहस्य, पान २००), हा लोक-संग्रहाचा अर्थ आहे. अर्जुनासारख्या क्षत्रियाला धर्मशास्त्राने घालून दिलेले हे कर्तव्य आहे.

पण अर्जुन आता असे म्हणत असेल, की हे कर्तव्यच मला नको, मी क्षात्रधर्माचा त्याग करतो; तर भगवान त्याला विचारतात, की क्षत्रियधर्माचा त्याग करण्याची प्रेरणा तुला व्यक्तिमत्त्वाच्या कोणत्या पातळीवरून मिळाली? इंद्रिये व त्यांच्यात गुंतलेले मन यांना जो सख्यासोयऱ्यांशी असलेल्या ममतेचा मोह पडतो, त्यातून तुला हा त्याग करावासा वाटतो का? की, अहंकारामुळे तू क्षत्रियत्व सोडू इच्छितोस? तू स्वतःच याचा विचार कर. अहंकाराच्या पलीकडे जाऊन आत्म्याकडून काय प्रेरणा मिळते ते पहा आणि तुझा तूच निर्णय घे. तेव्हा अर्जुनाने आत्मपरीक्षण करून निर्णय घेतला, की "हे अच्युता, माझा मोह नष्ट झाला, संदेह संपला, कर्तव्याची स्मृती झाली, तुझ्या म्हणण्याप्रमाणे युद्ध करतो."

सारांश, समाजाची जी घडी बसली आहे ती विस्कटून टाकण्याची कृती करावयाची असेल, तर त्यामागची प्रेरणा संशय, मोह, अहंकार इत्यादी अशुद्ध तत्त्वांनी गढूळ झालेल्या बुद्धीतून झाली आहे, की निर्मळ हेतूने व शुद्ध आत्म्यापासून मिळालेली प्रेरणा आहे, याचे परीक्षण केले पाहिजे. आणि ही गोष्ट केवळ चातुर्वर्ण्यांकित समाजापुरतीच नाही. आज आपल्याकडे भारतीय घटना आहे. त्या घटनेने प्रत्येक व्यक्तीचे आणि व्यक्तिसमूहाचे अधिकार व कर्तव्ये ठरवून दिलेली आहेत. लोकसंग्रहाच्या हल्लीच्या संकल्पनेचा ती कर्तव्ये व ते अधिकार हे भाग आहेत. आपण त्यांचे पालन केले पाहिजे, ही गीतेची व गीतारहस्याची आजच्या काळासाठी शिकवण आहे.

गीतारहस्यासारख्या तेजोभास्कराचा परिचय करून

देणारे हे भाषण एखाद्या पणतीच्या ज्योतीसारखे आहे. ही दीपकाळी लावण्याची संधी संयोजकांनी मला दिली व आपल्यासारख्या ज्ञानी श्रोत्यांनी तिचा इवलासा प्रकाश सांभाळला, यासाठी मी आपला कृतज्ञ आहे.

---

हे व्याख्यान २१ सप्टेंबर २०१२ रोजी देण्यात आले.

संदर्भ ग्रंथ :-

अ) श्रीमद् भगवद्गीता रहस्य अथवा कर्मयोगशास्त्र, बाळ गंगाधर टिळक, प्रकाशक दी. ज. टिळक व शे. श्री. टिळक, पुणे. आवृत्ती २० वी, सन २०००.

आ) The Data of Ethics-- Herberl Spencer, Williams & Norgate, London. 1879.

इ) Utilitarianism, Liberty & Representative Govermment-- John Stuart Mill, J. M. Dent & Suns. Ltd, London, 1936.



---

पुस्तक परीक्षण :

# "वाई : कला आणि संस्कृती" : काही राहून गेलेल्या बाबी!

प्रा. विजयकुमार फरांदे

वाई येथील मराठी विश्वकोशाचे एक संपादक डॉ. सु. र. देशपांडे यांनी 'वाई : कला आणि संस्कृती' हे पुस्तक लिहून वाईच्या कलात्मक व सांस्कृतिक वैभवाचे सुंदर दर्शन घडविले आहे. वाई गावाचा हा संदर्भग्रंथ मानला जाण्याची शक्यता असल्यामुळे माहितीची अचूकता असणे आवश्यक ठरते.

मुखपृष्ठ हे कलात्मक असले, तरी आतील कलात्मक चित्रे व फोटो यांच्या तुलनेने सुखावह वाटत नाही. चित्रकार एन. एस. बेन्द्रे, ज. द. गोंधळेकर, पारसनीस, जि. भि. दीक्षित, डॉ. वि. मा. बाचल, सु. पि. अष्टपुत्रे, पी. कांबळे अशा अनेक चित्रकारांनी वाई चितारलेली आहे. त्यांपैकी एखाद्याचे चित्र कव्हरवर टाकता आले असते. मंदिरांच्या शिखरांचे उत्तम फोटोग्राफ्स छापून वाईचे वैभव दाखविलेले आहे; परंतु एखाद्या मशिदीचा फोटो किंवा प्राज्ञपाठशाळेजवळच्या ईदगाहचा किंवा एखाद्या दर्ग्याचा फोटो नक्कीच छापता आला असता.

पृष्ठ ६९ वरील मराठी मिशन व चर्चची माहिती त्रोटक व चुकीची आहे. (डब्ल्यू. एफ. पी. एम. विलेमोरिया) असे जे छापण्यात आले आहे, ते चुकीचे आहे. विलिस फेअरबँक पिअर्स ह्या मिशनरी डॉक्टरने आफ्रिकेमध्ये प्रदीर्घ सेवा केल्यानंतर आपली सर्व मिळकत मिशन हॉस्पिटलला १९३५ मध्ये दिली. त्यामुळे हॉस्पिटलचे नाव विलिस फेअरबँक पिअर्स मेमोरिअल हॉस्पिटल असे ठेवण्यात आले. वाई येथे १८९२ मध्ये मिशनसेवेस सुरुवात झाली. त्यापूर्वी बदेवाडी-भुईंज येथे मिशनचे कार्य सुरू होते. १८९२ मध्ये वाई येथे स्वतंत्र मिशन केंद्र सुरू झाले. सौ. मिनी एल. सिब्ली आणि श्रीमती जीन पी. गॉर्डन यांची तेथे नेमणूक झाली. त्यांनी वाई आणि आसपासच्या खेड्यांत अकरा शाळा सुरू केल्या. पुढे रेव्ह. थिओडोर ली व त्यांची पत्नी हॅना ली यांना तेथे पाठविण्यात आले. १९०८ मध्ये डॉ. लेस्टर एच. बील्स व त्यांची पत्नी डॉ. रोज फेअरबँक बील्स यांनी वाई येथे वैद्यकीय सेवेचा पाया घातला. कासारमाडी येथे पहिला दवाखाना सुरू करण्यात आला. १९११ मध्ये मुंबईच्या एन. एम. वाडिया चॅरिटीजमधून रु.१०,००० ची देणगी मिळाली आणि १९१२ मध्ये पहिली इमारत बांधण्यात आली. १९१३ मध्ये लहानसेच पण सर्व साधनांनी युक्त असे रुग्णालय सुरू करण्यात आले. १९१४ मध्ये डॉ. आणि सौ. जस्टीन इ. ॲबट यांनी दिलेल्या देणगीतून प्रसूतिगृहाची जोड या रुग्णालयाला मिळाली. डॉ. वॉल्टर ह्यूम आणि डॉ. सौ. ह्यूम १९२० मध्ये वाईला आले. मिस कॅथरिन मिक्स, डॉ. हॅले एच कुक, डॉ. रोज स्मिथ, डॉ. एम. बी. गायकवाड, श्रीमती हेझल ॲटवूड, कु. सरस्वतीबाई गायकवाड यांनी हॉस्पिटलमध्ये काम केलेले आहे.

रेव्ह आणि सौ. जे. डब्ल्यू सिब्ले हे या मिशनास १८८५ मध्ये येऊन मिळाले. श्री. सिब्ले १८८८ मध्ये साताऱ्यास वारले. चार वर्षांनंतर श्रीमती सिब्ले यांना वाईस नेमण्यात आले. वाई येथे स्वतंत्र चर्च नव्हते म्हणून रेव्हरंड जे. डब्ल्यू. सिब्ले यांचे स्मारक वाईस व्हावे, असे वाटल्यावरून वाई येथील ख्रिस्ती व ख्रिस्तीतर लोकांच्या वर्गणीतून चर्चची उभारणी झाली. ख्रिस्ती सेवकांनी एक महिन्याचा पगार या मंदिरासाठी दिला आहे. ह्या चर्चचे उद्घाटन गुरुवार दि. २१ डिसेंबर १९१६ रोजी करण्यात आले. वाई चर्चची सर्व लहानथोर मंडळी गाणे गात गात मिशन बंगल्यापासून मंदिराजवळ मिरवणुकीने आली. या मंदिराचे नाव श्रीमती सिब्ले वारल्यानंतर देण्यात आले, असे जे म्हटले आहे ते चुकीचे आहे. चर्चचे नाव रेव्ह जे. डब्ल्यू. सिब्ले स्मारक मंदिर असेच आहे. (पाहा : अमेरिकन मराठी मिशनची दीडशे वर्षे, ले. रे. प्र. शि. भोसले, कार्याध्यक्ष, महोत्सव समिती.) मंदिर श्रीमती सिब्ले आणि कु. गॉर्डन यांच्या हस्ते उघडण्यात आले (पाहा : ज्ञानोदय, २८ डिसेंबर १९१६).

वाई येथे १९६२ मध्ये प्राज्ञपाठशाळा मंडळाच्या व्यवस्थापनाखाली मानव्य व वाणिज्य महाविद्यालय सुरू झाले. हे महाविद्यालय १९६८ साली जनता शिक्षण संस्थेकडे सुपूर्द करण्यात आले. या महाविद्यालयाच्या 'कृष्णाई' नियतकालिकाने किमान १४ वर्षे शिवाजी विद्यापीठाचे गुणवत्ता पारितोषिक मिळविलेले आहे. महाविद्यालयाच्या माध्यमातून अनेक लेखक, कवी, नाटककार पुढे आले. वाईतील वास्तू-शिल्पकला, पोथ्यांतील चित्रे, वाईची वर्तमानपत्रे, वाईची भित्तिचित्रे या विषयांवर प्रथम विद्यार्थ्यांनी लिहिलेले आहे. ते प्राथमिक स्वरूपाचे असेल, पण त्याचे महत्त्व कमी होत नाही.

वाईची ऐतिहासिक माहिती, मंदिर-वास्तु शिल्पशैली, चुनेगच्चीतील मूर्तिकला या प्रकरणातील माहिती संग्राह्य अशीच आहे. पृ. ४२ वर श्री काशीविश्वेश्वर मंदिराच्या खिडकीची जाळी छापलेली आहे. ह्या कलाकृतीचे नाव 'ख्याती', असे कोणी सांगितले आहे? वाईच्या इतिहासातील एक ठळक घराणे वगळले गेले आहे, ते म्हणजे पिसाळ देशमुख! वाई-पसरणीचे नबाब शेखमिरे यांची सविस्तर माहिती देता आली असती. वाईजवळील गावेही वैशिष्ट्यपूर्ण वारसा जपून आहेत. धोम, बावधन, पसरणी, किकली, भुईंज येथील मंदिरे, गावोगावच्या यात्रा, वाई गावातील सिद्धनाथवाडी, सोनगीरवाडी, रविवार पेठ, दाणेबाजार, गंगापुरी येथील यात्राही वैशिष्ट्यपूर्ण आहेत. वाईजवळील शिरवळचा किल्ला व चोपाळा वैशिष्टयपूर्ण असून तो नष्ट होण्याच्या मार्गावर आहे. वाईजवळील सोनजाई मंदिर, बावधनचे, फुलेनगरचे बगाड व इतरत्र निघणारी बगाडे यांचा किमान उल्लेख हवा होता. खंडाळा-लोणंद रस्त्यावरील मावशी या गावाचे पांढऱ्या मातीतले हिंगळाई देवीचे मंदिर, असा समृद्ध वारसा वाईपरिसराला लाभला आहे.

वाईच्या पूर्वभागातील शेतीसाठी पाणीपुरवठ्याची पूर्वीची योजना 'चवड्या पाट' जनतेच्या स्मरणातून निघून जाण्याची शक्यता आहे. किवरा ओढा हाही वाईच्या सांस्कृतिक जीवनाचा एक भाग म्हणावा लागेल. या ओढ्याच्या काठाजवळ असलेली एक शाळा, ज्या शाळेत आर्थिक दृष्ट्या व सामाजिक दृष्ट्या दुर्बल स्तरातील मुले शिकू लागली. किमान लिहायला, वाचायला तरी ती शिकली.

पोलिस आणि जनता यांतील सुसंवाद म्हणून वाई येथे 'जनता-पोलिस' ऐक्य मंडळ साकेवाडीमध्ये सुमारे पन्नास वर्षांआधी स्थापन करण्यात आले. महाराष्ट्रातील हा पहिलावहिला प्रयत्न असावा. असो.

येथील ब्राह्मसमाजाचे कार्यही तितकेच महत्त्वाचे आहे. वाई येथून जुन्या काळात अनेक नट पुढे आले. त्यांत काही गायकही होते. श्री. केशवराव गोरे, मोरोबा वाघोलीकर, मास्टर नूतन पेंढारकर उर्फ दामले ही नावे आद्य नाटकमंडळीत चमकली. अलीकडील काळात लावणीसम्राज्ञी यमुनाबाई वाईकर, महाराष्ट्रशाहीर कृष्णराव साबळे, सविता प्रभुणे, देवदत्त साबळे यांनी-ही परंपरा पुढे चालू ठेवली. नाटककार दिलीप जगताप यांच्या नाटकांचा उल्लेख केल्याशिवाय नाट्यपरंपरांचा इतिहास पूर्ण होऊ शकत नाही.

वाईच्या वाहतुकीचा इतिहासही मनोरंजक आहे. पूर्वी वाई-महाबळेश्वरचे टपाल वाठारमार्गे येत असे. घोड्याच्या टांग्यातून येत असे. वाठारमधून सुटलेली घोडी ही शिरगाव येथे बदलत. पुढे शिरगाव ते वाईतील सिद्धनाथवाडीपर्यंत घोडी पळवत. तेथे घोडी बदलून महाबळेश्वरला टपाल जायचे. टपालासाठी वाईच्या अंतूकाका देशपांडे यांचा टांगा तसेच श्री. शेरकर यांचा टांगा असे. त्या काळात बैलगाडीने वाठार ते वाई आणि वाई ते महाबळेश्वर असा प्रवास होत असे. सर्व्हिस मोटारी आल्यानंतर सुरुवातीसुरुवातीस ड्रायव्हर-लोक सोवळ्यात बसून गाडी चालवत. वाई-सातारा, वाई-महाड, वाई-ढेबेवाडी आणि वाई-पुणे या मार्गांवरून गाड्या धावत. मोटार सर्व्हिस कंपन्यांतील जीवघेणी स्पर्धा वाढू लागली, तेव्हा या सेवेचे राष्ट्रीयीकरण करण्यात यावे, असा विचारप्रवाह वाढू लागला. गोखले अर्थशास्त्र संस्थेने या विषयावर एक सर्वेक्षण आयोजित केले होते. तेव्हा पुणे आणि वाई येथील सर्व्हिस मोटार कंपन्यांच्या मुलाखती घेण्यात आल्या होत्या. शिदोरे मोटार ट्रान्सपोर्ट, वळे मोटार ट्रान्सपोर्ट, माहुलीकर ट्रान्सपोर्ट, दामूकाका प्रभुणे मोटार ट्रान्सपोर्ट, वाई-सातारा मोटार युनियन या काही कंपन्या होत. (अभ्यासूंनी

अनुक्रमणिका

'एस.टी.तील दिवस'– ले. श्री. न. गो. पंडित हा ग्रंथ संदर्भासाठी पहावा.)

अशा अनेक गोष्टी ज्या राहिल्या असतील, त्या अशा ग्रंथात समाविष्ट कराव्यात, म्हणजे वाईतील सांस्कृतिक घटकांना यथायोग्य तो न्याय मिळेल.

पूर्वी वाईमध्ये संस्कृतविद्या शिकविण्यासाठी अनेक पाठशाळा होत्या. त्यांतील एकही आज कार्यरत नाही. पूर्वी वैदिक पठणाच्या बाबतीत एक म्हण सांगितली जात असे– १०० नाशिककर म्हणजे १ काशीकर, तर १०० काशीकर म्हणजे एक वाईकर!

वाई हा पूर्वी मुद्रणालयांचा गाव म्हणून ओळखला जाई. विराज वैभव, मोदवृत्त छापखाना, श्रीकृष्ण छापखाना, प्राज्ञ प्रेस, विठ्ठल प्रेस, यशवंत प्रेस, ओम दत्त, सिद्धनाथ छापखाना, चव्हाण मुद्रणालय हे काही छापखाने होत. येथील मोहोरेदार छपाई महाराष्ट्रात लोकप्रिय होती.

रविवार पेठ येथील सरदार एरंडे यांच्या वाड्यात एका ट्रंकेत जे कागद मिळाले, ते अगदी १८५७ सालचे अस्सल होते. त्यामुळेच इतिहासाचार्य राजवाडे यांना धांडोळा घेण्याची स्फूर्ती मिळाली.

वाईच्या वर्तमानपत्रांची दखल डॉ. सु. र. देशपांडे यांनी घेतली हे योग्यच झाले. परंतु एखाद्या वर्तमानपत्राचा फोटो यात छापला असता, तर अलीकडच्या पिढीला ते उपयुक्त ठरले असते.

ज्या हरभट मोने या चित्रकारांची लघुचित्रशैलीतील चित्रे ह्या पुस्तकात छापली आहेत, त्यांचा परिचय नव्या पिढीसाठी करून दिला असता, तर ते अधिक योग्य ठरले असते.



---

वाई : कला आणि संस्कृती
आस्था पर्यावरण मैत्री संस्था, वाई,
किंमत रु. ४००/–, पृ. १६०,
प. आ. २०११.

---

पुस्तक परीक्षण :

# लौकिक-अलौकिकाचे 'मानसतरंग'

प्रा. डॉ. पंडितराव पवार

डॉ. अनिल सहस्रबुद्धे हे बहुआयामी साहित्यिक म्हणून प्रसिद्ध आहेत. लोकसाहित्य, संशोधन, समीक्षा इ. क्षेत्रांत त्यांचे कार्य लक्षणीय आहेच; परंतु कादंबरी, कथा, कविता, नाटक, ललित आणि वैचारिक वाङ्मय या प्रांतांतही त्यांची प्रतिभा लीलया संचार करताना दिसते. तरल प्रतिभेचा हरहुन्नरी लेखक म्हणून त्यांची प्रतिमा साहित्यप्रांतात ठळकपणे उमटली आहे, हे त्यांच्या साहित्य-कर्तृत्वावरून सहजपणे ध्यानी येते.

यापूर्वी डॉ. सहस्रबुद्धे यांचे 'आव्हान', 'कोऽहम्', 'प्रिया', 'श्री अगस्त्यमाहात्म्य' (पोथी) असे कवितासंग्रह प्रकाशित झाले आहेत. अलीकडेच त्यांचा 'मानसतरंग' हा कवितासंग्रह (डिसेंबर२०११ मध्ये) प्रकाशित झाला आहे. कवीने आशयविषयाच्या अनुषंगाने या कवितासंग्रहाची 'तरंग' (४१), 'रंग' (२७) आणि 'निःसंग' (३२) अशा कवितांत विभागणी केलेली आहे. या कवितांना अनुक्रमे गेय, मुक्त आणि मुक्तछंदाचे रूप प्राप्त झालेले आहे, असे ढोबळमानाने म्हणता येईल.

**कवीची काव्यदृष्टी**

कवीचा काव्यविषयक दृष्टिकोण अत्यंत स्पष्ट आणि जीवनस्पर्शी आहे. कविता ही कवीचा श्वास असतेच, पण तिला समाजाचे भान असणेही तितकेच महत्त्वाचे आहे. म्हणून कवीच्या दृष्टीने कविता म्हणजे,

'व्यवहाराची साक्ष असते, जीवनाचे भाष्य असते!

.......................................................

कविता म्हणजे श्वास असते ! कविता म्हणजे स्पर्श असते!

.......................................................

कविता म्हणजे सृष्टीही असते आणि अवकाशही असते!
कविता म्हणजे कविता असते!
मानव्याचे अस्तित्व असते आणि
अस्तित्वाची संवेदना असते!
अनंत, संजीवक आणि मृत्युंजय!' (पृ. ९२)

या काव्यपंक्तींतून कवीचा काव्यविषयक समग्र दृष्टिकोण आकळतोच; पण कविता या वाङ्मयप्रकाराचा एकंदर अवकाशही अत्यंत अर्थपूर्ण शब्दांत स्पष्ट झाला आहे. कवितेत व्यवहार आणि जीवनभाष्य तर असतेच; पण सृष्टी आणि अवकाश म्हणजे प्रकृती आणि पुरुषालाही ती कवेत घेते. पौराणिक साहित्यापासून संत-पंत आणि तंतांच्या साहित्यात ही सृष्टी आणि अवकाश प्रकटले आहे. कवितेत माणसाच्या विविध वृत्तिप्रवृत्तींबरोबरच 'ओकत्या लाव्हा'चे दर्शनही घडते. म्हणून तिचा अवकाश खूपच मोठा आणि व्यामिश्र आहे. जीवजगताचे अस्तित्व, त्याची रागलोभाची स्पर्शसंवेदना आणि मृत्युंजयता हा सगळाच आवाका काव्यविषय असतो. कवीचं हे भाष्य नुसते मार्मिक नाही, तर त्याला व्युत्पन्नतेची जोड आहे, असे म्हटले तर वावगे ठरू नये. आणि कवीची हीच काव्यविषयक दृष्टी कमीअधिक प्रमाणात त्याच्या 'मानसतरंग' मध्ये प्रत्ययास येत राहते.

'व्यवहाराची गणिते सुटली
परतत्त्वाची खूण मिळाली
काया माझी पावन झाली
शब्दांतून असे श्वास भोगतो'. (पृ.३९)

मनातील भावभावना काव्यरूपात व्यक्त झाल्यावर कवीला 'आभाळासह मोकळा' झाल्याचा प्रत्यय येतो. 'व्यवहार' म्हणजे लौकिक आणि 'परतत्त्व' म्हणजे पारलौकिकाच्या खुणा कवी अनुभवतो. परंतु ही केवळ स्वान्तसुखाय निर्मिती नाही. पण ऐहिक आणि पारलौकिकाचे रंग उधळताना हा कवी समाजमनस्कही होतो, हे त्यांच्या एकंदर काव्यानुभवाच्या प्रकटीकरणातून जाणवत राहते.

मायमराठी वंदना करताना त्यांनी मराठी सारस्वताच्या

अनुक्रमणिका





आरंभापासून आजपर्यंतच्या मराठी काव्यपरंपरेचा गीत-स्वरूपात काव्यमय आढावा घेतला आहे. अभंग, ओवी, श्लोक, नाट्यगीत, आधुनिक मराठी कविता, भावगीत, फटका, मुक्तछंद आणि मुक्तरचनेपर्यंतचे रचनाबंध आणि त्यांतील आशयासह प्रातिनिधिक मनोवेधक दर्शन घडविले आहे. या काव्यमय रचनेतून एकूणच मराठी साहित्याचा पटच कवीने सहजपणे उभा केला आहे. 'मुक्तछंदा'तील एका कवितेत ते लिहितात,

'वाघा उठ, झोपू नको
मायमराठी लोपून जाईल असे काही करू नको
.............................
अटकेपासून कटकेपर्यंत, गोव्यापासून तंजावरपर्यंत
मराठ मुलूख सोडू नको
..............................
यंत्रापासून मंत्रापर्यंत, व्यवहारापासून विधानांपर्यंत
चपराशापासून सचिवापर्यंत
मजूरापासून महासत्तेपर्यंत
मराठी मन मराठी मनगट,
भक्कम बनविल्याशिवाय राहू नको.'(पृ.१४-१५)

मुक्तछंदातील या रचनेतून कवीची प्रगमनशीलता, मराठी साहित्याच्या सर्व प्रवाहांची स्वागतशीलता आणि मातृभाषेबद्दलची अस्मिताच प्रकट झाली आहे.

**कवीची समाजमनस्कता :**

समाजात वावरताना प्रत्यही अनेक समस्यांना तोंड देत माणूस जीवनाची वाटचाल करतो. अशा वेळी कवीदेखील सामान्य माणसाप्रमाणे समाजाचा घटक असतो, याचे चांगले भान या कवीला आहे. समाजाच्या सुख-समृद्धीत, शांततेत त्याचेही जीवन सार्थकी लागते. युगधर्मानुसार समाजाचे स्थान अबाधित राहावे, हीच कोणत्याही सामान्य माणसाप्रमाणे कवीची धारणा आहे. म्हणून शतकानंतरचा त्यांचा 'नवा शिपाई' नव्या दमाने घोषणा करताना म्हणतो,

'तस्कर कोणी कुणी आतंकी कोणी नक्षालाईट असे!
मानवतेला चिरडून पायी रक्तपिपासा आस असे!
समान ममता आणि बंधूता दावणीला बंदिस्त यांच्या!
वस्तीपासून विश्वावरती ठोकी गोळ्या दहशतीच्या!
न्यायदेवते फासून काळे पाखंड करी कल्याणाचे!
गाडू ऐशा नराधमांना नृसिंह गर्जना झाली हो!' (पृ.४३)

या काव्यपंक्तींतून आजच्या समाजातील दहशतवाद, धर्मांध वागणुकीचा उच्छाद आणि स्वातंत्र्य-समतेला रोज दिली जाणारी तिलांजली, यांचे मर्मभेदक दर्शन घडते. गेल्या शतकात समाजात वर्णभेदाची आणि विषमतेची जी अवस्था होती, त्याविरुद्ध केशवसुतांचा 'नवा शिपाई' अवतरला होता. आजच्या समस्यांचे स्वरूप वेगळे आणि अधिक जीवघेणे आहे. राज्यात आणि देशातही आतंकवादाने सामान्य माणसाचे जीवन अवघड केले आहे. धार्मिक अहंकारातून समाज वेठीस धरला जात आहे. अशा नराधमांना तळाशी गाडल्याशिवाय सर्वसामान्यांचे जीवन सुखी होणार नाही, ही कवीची मनोभूमिका समाजहिताचा व्यापक विचार करणारी आहे. यातून कवीची समाजमनस्कता आणि तळमळही व्यक्त झाली आहे.

अशी समाजव्यवस्था सुरळीत ठेवण्यासाठी भूमिपुत्रांनी आपले अवसान सोडून उमेदीने कार्यतत्पर होण्याची गरज आहे.

'ज्योती आम्ही भीम आम्ही समता शिपाई रांगडे।
भ्रांत तुम्हा का पडे?'

असा प्रश्न विचारून कवी आपल्या प्रगल्भ-प्रगमनशील वैचारिक वारशाचा दाखला देऊन जनतेला अस्मिता जागी करून कृतिप्रवण होण्याचे आवाहन करतो.

**आध्यात्मिक–ऐहिकांचा समन्वय**

भारतीय संस्कृती सत्यशिवसौंदर्य अशा उदात्त जीवनमूल्यांची पूजा बांधणारी आहे. जीवनाच्या आध्यात्मिक आणि भौतिक अंगांना आपल्या जीवनप्रवाहात प्राधान्य आहे. आध्यात्मिक अंगाने मानवी मनाला सुखाची प्राप्ती होत असून भौतिक साधनांमुळे ऐहिक जीवनात समृद्धी येते. कवीची आध्यात्मिक दृष्टी नितळ असून मानसिक-भावनिक उन्नयनाचा अनुभवही तो आपल्या कवितेत साकारतो. ब्रह्म, चैतन्य, केवल्य यांसारख्या शब्दांतून कवीचा हा आत्मसाक्षात्कार ठायी ठायी प्रकटतो. संतमहात्म्यांचे, ऋषिमुनींचे संदर्भही कवीच्या पारलौकिक सुखाला बळकटी आणतात.

'एका ॐकाराचा। एवढा विस्तार
भरे नादब्रह्म । मृत्यूलोकी.' (पृ.४९)







असा अध्यात्म आणि ऐहिकाचा समन्वय कवी साधतो. या अध्यात्मजाणिवेचा प्रत्यय कवी सहजपणे शब्दांतून साकारतो. सर्व विश्वच ब्रह्मांडासम असल्याचे कवीस वाटते. एवढेच नव्हे तर 'ॐकाराच्या जपे। जीव मुक्त' होतो, असे कवीचे भाष्य आहे. यातून कवीची आध्यात्मिक दृष्टी स्पष्ट व्हावी. एवढेच नव्हे तर, हिमालयात हिममग्न अमरनाथाचे दर्शन घडताच 'तुटले अवघे पाश' हा लौकिकाच्या पलीकडील अनुभव कवीला चैतन्याच्या स्फटिकमय जगात घेऊन जातो. त्यामुळे 'शिव अवकाश व्यापून' असल्याचा 'सोलीव' सुखाचा प्रत्यय कवीला येतो. आणि त्याचा अपरिहार्य परिणाम म्हणजे 'मुखरित केले जीव शिवा' असा अद्वैताचा अनुभव काही क्षण कवीला येतो.

या अध्यात्माच्या सुखाबरोबरच आजची भौतिक परिस्थिती कवीला अस्वस्थ करते. विज्ञानयुगाने मानवी जीवनात प्रगती केली, पण

'बटणाचा दास। यंत्राचा गुलाम
झालो मुक्त नित्य । स्वयंभू मी.' (पृ.५८)

ही गुलामगिरी माणसाची परवशता सूचित करते. या यंत्रयुगात नातीगोती स्क्रॅप होत आहेत. 'ग्लोबल' संस्कृतीमुळे 'स्क्रीनी' जग आले आणि 'फास्ट फूड'च्या जमान्यात जीवनानंद तो गमावून बसला, याची खंत कवीला वाटते. आणि माणूस विज्ञानशरण झाला आहे, हे उघड सत्य आहे. जाहिरातीच्या क्षेत्रात क्रांती झाली. मोबाईलवरील मादक आवाजातील जाहिराती निव्वळ माणसाला 'ऑफ' करण्यास येतात, हे कवीने उपरोधाने सांगितले आहे. 'इंटरनेट' साथीने प्रतिभावंत नेस्तनाबूत होऊन माणूसच स्वतःला संपवू लागला, हीसुद्धा विज्ञानाची किमयाच आहे. एकंदरीत विज्ञानाने सुखे पुरविली आणि माणसाचा रोबो बनवून तो पांगळा, शरणागत बनविला, हे कवीने केलेले चित्रण आजच्या घडीला वास्तवच म्हटले पाहिजे. त्यामुळे 'स्वार्थ गेला, परमार्थ गेला, माणसातला माणूस निसटून गेला', हेच विज्ञानयुगाचे फलित होय, हे कवी परोपरीने सांगू पाहतो. कारण माणसाला 'ग्लोबल वार्मिंगचा ठसका' अस्वस्थ करीत आहे. महासत्तेची लालसाही माणसाला स्वस्थ बसू देत नाही.

### जीवन उमगलेच नाही

लौकिक-अलौकिकाच्या व्यवहारात कवी आपल्या जीवनाचे निर्माल्य झाल्याचे म्हणत असला, तरी प्रपंच इतका सोपा नाही, याचीही बोचरी जाणीव कवी अनुभवतो.

'व्यवहार व्यवहार। जीवनाचा परिहार'

यातून कुणाची सुटका नाही. मात्र,

'उतु नको मातु नको भोगताना
भाग्य ऐसे सीमा तू लंघू नको'

याचेही भान कवीने ठेवले आहे. आपल्या मर्यादांची जाणीव असणे, ही जीवनाच्या वाटेवरील एक शर्तच आहे. असे असले, तरी दुबळेपणा न बाळगता 'मातीचे पंख जरी गरुडाची झेप' घेण्याची महत्त्वाकांक्षाही कवीने बाळगलेली आहे. त्यामुळे कधीकधी 'चकव्यांना'ही सामोरे जाऊन करकचून जावे लागले, हेही कधी कळले नाही. पण 'ध्येयास अंत' नसल्याने 'अवकाश' हेच क्षितिज मानणाऱ्या विजुगीषू वृत्तीच्या मनाला 'साम्राज्य' बांधण्याची ऊर्मी स्वस्थ बसू देत नाही.

जीवनाच्या वाटचालीत 'प्रपंचाच्या पाशात क्लेशांचे मळे' फुलवितानाही कवी आनंदविभोर होतो, आणि 'ज्ञानाच्या मस्तीत मनमुराद झिंगताना विश्वरूप' झाल्याचा विराट अनुभवही कवी घेतो. त्यामुळे कवीला स्वतः 'पावन' झाल्याचाही प्रत्यय येतो. आणि त्याचबरोबर 'काळ येतो अन् बरळतो तोचि सारे घडवितो' हाही अनुभव घेऊन कवी जीवनव्यवहारात तावूनसुलाखून निघतो. काळाच्या पुढे कुणाचेही काही चालत नाही, हे वैश्विक सत्य कवी पुनःपुन्हा खात्री करून स्वीकारतो. आणि 'हेल्याचे पाणी वाहणे सुरूच' राहिल्याने 'जीवनपण उमगलेच नाही' ही जीवनाची गूढता कवीलाही अखेरीस मौनातच मान्य करावी लागते. म्हणूनच बुद्धाच्या स्मिताचा अर्थ उमजला नाही किंवा कौरव खरे की रावणाचे वर्तन खरे, याचा न्यायनिवाडा नैतिक मूल्यांचा ऱ्हास होणाऱ्या या जगात करणे अवघड झाले आहे. म्हणून 'आयुष्य म्हणजे नक्की काय?' हेही माणसाला ठळकपणे जाणवत नाही, हाच प्रश्न कवीला अनाकलनीय आहे. जोपर्यंत माणूस स्वतःला पूर्णपणे ओळखत नाही किंवा उमगत नाही, तोपर्यंत असे प्रश्न नीती-अनीतीच्या प्रवाहातून बाजूला सरकत जातात, असे कवीस वाटते.

गालावरील तिळासारखे दिसणारे मुद्रणदोष दुरुस्त करण्याची गरज आहे. एकंदरीत एका आस्वादक्षम आणि बहुआयामी काव्यग्रंथाची भर मराठी काव्यसंग्रहात पडली आहे, हे नक्कीच!

मानसतरंग - अनिल सहस्रबुद्धे
क्रिएटिव्ह प्रकाशन, अहमदनगर.
प.आ. ३१ डिसेंबर २०११
किंमत रु. १०१/-

---

## लेखकांचा परिचय

❖ **प्रा. संतोष शेलार**

इतिहासाचे प्राध्यापक, कर्मवीर आबासाहेब सोनवणे महाविद्यालय, सटाणा, ता. बागलाण, जि. नाशिक.
***पत्ता :–*** C/o संभाजी भदाणे, साई निवास, ताहराबाद रोड, सटाणा. जि. नाशिक.
भ्रमणध्वनी :- ९९७५१२४१२०, ९४०३९८०१३३.

❖ **डॉ. सुभाष सावरकर**

एम्. टेक., एम्. ए., पीएच्. डी., अमरावती पॉलिटेक्निक येथे प्राचार्य. अक्षर वैदर्भी मासिक या वाङ्मयीन नियतकालीकामध्ये लेख प्रकाशित. कथासंग्रह, नाटक, कादंबरी, काव्यसंग्रह यांची समीक्षा लेख प्रकाशित. १० पुस्तके संपादित.
***पत्ता :–*** जनसाहित्य भवन, गणेश कॉलनी, अमरावती – ४४४६०५.
दूरध्वनी : (०७२१) २५७७४१८.

❖ **प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच्. डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध.
***पत्ता :*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११००४.
दूरध्वनी :- (०२०) २५६७४०९३.

❖ **प्रा. विजयकुमार फरांदे**

निवृत्त उपप्राचार्य, अर्थशास्त्राचे निवृत्त प्राध्यापक, किसनवीर महाविद्यालय, वाई जि. सातारा.
***पत्ता :–*** शाकुंतल, प्राध्यापक कॉलनी, वाई, जि. सातारा.

❖ **प्राचार्य डॉ. पंडितराव पवार**

मराठीचे निवृत्त प्राध्यापक. एम. ए., पीएच. डी. (मराठी); नाशिक जिल्हा मराठा विद्याप्रसारक समाज, नाशिक या संस्थेत ३० वर्षे प्राचार्य. पुणे विद्यापीठाचा उत्कृष्ट प्राचार्य म्हणून पुरस्कार. साहित्य व शिक्षण यांवर लेखन, गेली चाळीस वर्षे उच्चशिक्षण क्षेत्रात कार्यरत.
***पत्ता :*** ६, ऋषिराज पार्क, अरिहंत नर्सिंग होमजवळ, गंगापूर रोड, नाशिक – ४२२०१३.
दूरध्वनी :- (०२५३) २३४३७८७.

---

**डॉ. वैशाली श्रीकृष्ण भालसिंग** यांचा परिचय ऑगस्ट २०१२ च्या अंकामध्ये नजरचुकीने चुकीचा छापण्यात आला होता. त्यांचा परिचय पुढीलप्रमाणे- एम्. ए., पीएचडी. (मराठी), अधिव्याख्याता मराठी विभाग, न्यू आर्टस्, कॉमर्स ॲण्ड सायन्स कॉलेज, पारनेर, जि. अहमदनगर. विज्ञान साहित्याची संकल्पना आणि जयंत नारळीकरांचे विज्ञान, साहित्य यावर प्रबंध तसेच जुन्या व नव्या वाङ्मयाचा सारख्याच समरसतेने परामर्श घेणारे अनेक स्रोत निबंध प्रकाशित.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# वैदिक संस्कृतीचा विकास

(तिसरी आवृत्ती, १९९६)

**प्रा. मे. पुं. रेगे यांच्या विवेचक पुरस्कारासह**

वैदिक संस्कृतीचा विकास ह्या बृहद् ग्रंथात शास्त्रीजींनी अधिकाराने आणि कौशल्याने आपल्या प्रदीर्घ सांस्कृतिक वारशाचे आत्मीयतेने पण चिकित्सकपणे परीक्षण केले आहे. त्यांच्या संस्कृत वाङ्मयाच्या व्यासंगाच्या व्याप्तीची कल्पना या ग्रंथावरून चांगली येते. वैदिक वाङ्मय, दर्शने, महाकाव्ये, शास्त्रे, पुराणे, बौद्ध व जैन साहित्य इत्यादी सर्व शाखांतील संस्कृत साहित्याचा त्यांनी आपल्या विवेचनात पुरेपूर उपयोग केला आहे. वैदिक संस्कृतीची समावेशक, उदार, विधायक बाजू त्यांनी उलगडून दाखविली आहे.

**डेमी आकाराची ३६+ ५७२ पृष्ठे**

**किंमत रू. ३००/-**

**प्राज्ञपाठशाळा मंडळ**

३१५, गंगापुरी, वाई, जि. सातारा

अनुक्रमणिका

# लेखकांस आवाहन

'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.

४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी. आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

अनुक्रमणिका








# नवभारतास

# हार्दिक

# शुभेच्छा !

**– पु.ना. गाडगीळ आणि कंपनी यांच्याकडून**

हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका